


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४१ । अंक ३ । डिसेंबर १९८७

किंमत ६ रुपये वार्षिक वर्गणी ४५ रुपये

आजीव सदस्य वर्गणी–

व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.



**संपादकीय पत्रव्यवहार :**

मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**

श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले.

अनुक्रमणिका






# नवभारत

डिसेंबर १९८७

अ नु क्र म



## लेखक-परिचय

■ **अ. ना. ठाकूर** : मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई—४१२ ८०३. ■ **व. वि. अकोलकर** : मानसशास्त्राचे सेवानिवृत्त प्राध्यापक व संचालक, पॅरासायकॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिटयूट; 'स्वरमाला' ७०-९ब, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे—४११ ००४. ■ **रा. ग. जाधव** : मराठी समीक्षक, मराठीचे माजी प्राध्यापक व विश्वकोशाच्या मानव्यविद्या कक्षेचे प्रभारी विभाग-संपादक, वाई—४१२ ८०३. ■ **अविनाश सहस्रबुद्धे** : ग्रंथपाल, चेतनाचे हजारीमल सोमाणी कॉलेज, वांद्रे (पूर्व), मुंबई; विविध नियतकालिकांतून समीक्षात्मक लेखन; निवास : ६/२०१, योगानंद सोसायटी, वझिरी नाका, बोरिवली (प.), मुंबई—९२.

○ ○ ○

# संपादकीय

## हे राम !

ज्या धार्मिक संस्कृतीत बहुदेवतावाद प्रचलित असतो तिच्यात देवाविषयीची कल्पना काय असते ? राम, कृष्ण, शंकर, विठ्ठल, गणपती इ. आजच्या हिंदूंचे जिवंत देव आहेत. काली (काळूबाई), दुर्गा-शांतादुर्गा इ. जिवंत देवी आहेत. आजचे हिंदू ह्या देवतांना भजतात. इंद्र, वरुण इ. वैदिक देवतांप्रमाणे त्या दूर सरकलेल्या नाहीत. 'इंद्र हा आजच्या हिंदूंचा देव आहे की नाही ? ह्या प्रश्नाचे ठाम उत्तर 'तो देव आहे' असेच असेल. आस्तिक हिंदू इंद्राचे देवत्व अमान्य करणार नाही. पण आज प्रचलित असलेल्या उपासनांत, भजन–पूजनात इंद्राला स्थान नाही. हिंदूंच्या देवतांना कालाची मर्यादा पडते किंवा पडल्यासारखी भासते तशी स्थान-मर्यादाही पडल्यासारखी भासते. श्रीवेंकटेश्वर आणि श्रीपद्मावती हे तिरुमलईचे जोडपे आहे. त्यांचे दर्शन घ्यायचे तर तिरुमलईला गेले पाहिजे. पण श्रीवेंकटेश्वराचे मंदिर कुठेही बांधता येते. म्लेच्छभूमी असलेल्या अमेरिकेतसुद्धा. तिरुमलईचा श्रीवेंकटेश्वर खरा आणि इतर ठिकाणचे श्रीवेंकटेश्वर खोटे असे कोण म्हणणार ? किंवा तिरुमलईचे मंदिर हे मूळ, मुख्य, प्रधान मंदिर आणि इतर ठिकाणची श्रीवेंकटेश्वराची मंदिरे ही नंतरची, दुय्यम, गौण मंदिरे असेही म्हणता येणार नाही. जेथे देवाची वसती आहे ते स्थान दुय्यम, गौण कसे म्हणता येईल ? मंदिर म्हणजे वास्तू नव्हे. वास्तुशास्त्रज्ञ, इतिहासकार कोणती वास्तू तुलनेने पुराण, कोणती अलीकडची, कोणती मूळ, कोणती प्रतिकृती हे ठरवू शकतात. पण मंदिर चिरंतन असते. मूर्ती म्हणजे देव नव्हे. मूर्ती भंगते. देव भंगत नाही. हे सर्व मान्य करूनही तिरुमलईचे विशेष स्थानमाहात्म्य आहे की नाही ? आहे आणि नाहीही. ते आहे म्हणून भक्त अनंत अडचणी सोसून तिरुमलईला जातील आणि श्रीवेंकटेश्वराचे प्रत्यक्ष दर्शन घेतील. आणि तसा योग आला नाही तर देवाची आपल्यावर अवकृपा झाली म्हणून हळहळतील. पण भक्ती शुद्ध असेल तर भक्त असेल तेथे श्रीवेंकटेश्वर धावून येईल आणि प्रकट होईल. म्हणून तिरुमलईचे काहीही स्थानमाहात्म्य नाही. पण हा अखेरचा शब्द नाही. कारण अंतःकरणातील जागृत देवाचा प्रत्यय ज्याला आला आहे असा भक्तही तिरुमलईच्या श्रीवेंकटेश्वराचे दर्शन घ्यायला तळमळेल.

हिंदूंचा देव पार्थिव आहे आणि आध्यात्मिक आहे. देव ही मूर्ती आहे, माणूस आहे आणि चराचराला व्यापून पलीकडे असलेला ईश्वर आहे. त्याची पार्थिवता हे त्याच्या दिव्यत्वाचा अनुभव साधण्याचे बाह्य साधन नाही. त्याची पार्थिवता हा देवाच्या स्वरूपाचा अविच्छेद्य भाग आहे. मूर्तीची पूजा, देवाच्या मानवी चरित्राचे स्मरण, ध्यान, इ. ह्या ईश्वराच्या शुद्ध, आध्यात्मिक स्वरूपाचा अनुभव घेण्याच्या साधनेतील प्राथमिक पायऱ्या आहेत, त्या अटळ असल्या तरी, त्या ओलांडून, त्यांना मागे टाकून शुद्ध अनुभवाच्या क्षेत्रात साधक प्रवेश करतो आणि मग ह्या अनुभवातच तो रमतो असे नसते. ह्या पायऱ्या तो मागे टाकीत नाही. देव नेहमीच पार्थिव आणि शुद्ध असाच राहतो. ही तार्किक विसंगती आहे यात शंका नाही. पण अध्यात्माचे क्षेत्र हे तार्किक विसंगतीचे क्षेत्र आहे.

त्वं त्वमेवाहमेवाहं त्वमेवासि न चास्म्यहम् ।
अहं त्वमित्युभौ न स्तो यत्र तस्मै नमो नमः ।।
अन्तर्देहे मया नित्यं त्वमात्मा च गवेषितः ।
न दृष्टस्त्वं न चैवात्मा यच्च दृष्टं त्वमेव तत् ।।
भवद्भक्तस्य संजातभवद्रूपस्य मेऽधुना ।
त्वामात्मरूपं संप्रेक्ष्य तुभ्यं मह्यं नमो नमः ।।

[ तू तूच आहेस आणि मी मीच आहे; पण फक्त तूच आहेस, मी नाहीच. ज्यात तू आणि मी असे (भिन्न) दोन नाहीत त्या (अस्तित्वाला) अनेकदा नमस्कार असो. देहाच्या अंतरंगात मी तुला आणि माझ्या

आत्म्याला शोधीत होतो. मला तू दिसला नाहीस, आत्माही दिसला नाही. मला जे दिसले तो तूच होतास. तुझा मी जो भक्त त्याला आता तुझे रूप प्राप्त झाले आहे. माझे रूप धारण करणारा तू आहेस हे पाहून मी तुला आणि मला नमस्कार करतो.]

देव आणि भक्त यांच्यामधील अद्वैताची कल्पना (किंवा अनुभव) एका बाजूला आणि देव हा एक विशिष्ट माणूस आहे आणि माणूस म्हणून माणसाचे चरित्र तो जगतो ही कल्पना दुसऱ्या बाजूला– ह्या दोन्ही टोकांना हिंदू आध्यात्मिकता सामावून घेते. राम आणि कृष्ण हे दोन भिन्न देव आहेत की नाहीत? एका देवाची ती भिन्न रूपे, अवतार आहेत असे सांगून देवाची केवल एकता टिकवून धरण्याचा प्रयत्न करण्यात अर्थ नाही. कारण देवाचा अवतार हा देवच असतो. हा पूर्णावतार आणि तो अंशावतार असा भेदही टिकणार नाही. सर्व अवतार पूर्णावतार आहेत आणि सर्व अवतार अंशावतार आहेत. अविभक्तं विभक्तेषु.

राम आणि कृष्ण हे जर भिन्न देव असतील तर त्यांची चरित्रेही भिन्न असणार. ही दोन माणसे आहेत. त्यांचे आईवडील वेगळे, जन्मस्थान, जन्मकाल वेगळे, आवडीनिवडी वेगळ्या, त्यांचे पराक्रम, यशापयश इ. वेगळी असणार. केवळ माणसेच देव असतात असे नाही. मासा, कासव, रानडुकर हेही देव आहेत. आपापले अवतारकार्य संपवून ते अंतर्धान पावतात. पण त्यांचे देवत्व टिकून राहते. श्रीकृष्णासारखा देव असलेला माणूस घेतला तर माणूस म्हणून तो एक आहे. पण हा एक माणूस म्हणून तो एकच देव असला पाहिजे. माणूस असलेल्या श्रीकृष्णाच्या आयुष्याची सुरुवात लहान मूल म्हणून अटळपणे झाली असणार. हा त्याच्या मानवी चरित्राचा भाग आहे. पण बाळकृष्ण हा स्वतंत्र, स्वयंभू, परिपूर्ण असा देव आहे. श्रीकृष्ण हा माणूस एक देव आहे. बाळकृष्ण हा देव वेगळा आहे. बाळकृष्ण हा देव कधी वाढत नाही. तो बाळच राहतो. तेव्हा श्रीकृष्ण ह्या माणसात दोन देव सामावलेले आहेत. एक नित्य बाळ राहणारा बाळकृष्ण आणि श्रीकृष्ण (ह्या माणसाच्या) सबंध चरित्राला व्यापणारा श्रीकृष्ण. गोकुळात खोड्या करणाऱ्या आणि दहीदुधाची चोरी करणाऱ्या बाळकृष्णाची कृत्ये आणि कुरुक्षेत्रात अधिकारवाणीने भगवद्गीता सांगणाऱ्या श्रीकृष्णाची कृत्ये यांची संगती कशी लावायची हा चरित्रकारांचा प्रश्न आहे. हा बाळकृष्णाच्या किंवा श्रीकृष्णाच्या भक्तांचा नाही. बाळकृष्ण हा हिंदू स्त्रियांचा कदाचित सर्वात जवळचा देव असेल. घरोघरी बाळकृष्ण आहेत. किंवा एका काळी होते. ह्यात स्त्रियांना गौणत्व होते असे नाही. घरघरच्या कुमारिका देवी होत्या. बाळकृष्ण वाढत नाही. म्हणून मुलगा वाढला की तो बाळकृष्ण उरत नाही.

राम, कृष्ण हे माणूस-देव आहेत. म्हणून कदाचित ते सर्वांत जास्त लोकप्रिय असतील. नृसिंहाला असे जन्मापासून मृत्यूपर्यंतचे मानवी चरित्र नाही. तो केवळ देव राहतो. एका कृत्यात त्याचे अर्ध-मानुष चरित्र संपते. विष्णु अवतार घेतो. म्हणून तोही केवळ देव राहतो. माणसांच्या जगापासून दूर. शंकराला त्रोटक, धूसर मानवी चरित्र आहे. नाती आहेत, गण आहेत. स्वभाववैशिष्टच आहे. तो भोळा, रागीट आहे. ह्यामुळे तत्त्ववेत्त्यांच्या– शैवांचा– देव असूनही तो माणसांना विष्णूपेक्षा जवळचा आहे. विष्णु बराचसा तत्त्ववेत्त्यांचा देव राहिला आहे. श्रीकृष्णाच्या रूपाने तो माणसांच्या जवळ आला आहे.

काही देव असे असे आहेत की त्यांना चरित्र नाही; माणसांच्या अनुभवात त्यांना केवळ एक भूमिका आहे. उदा. कामदेव. स्त्री-पुरुषांमधील आदिम, अदम्य आकर्षण माणसांना अत्युत्कट, देहभान हरपवणारा, स्वतःपलीकडे नेणारा विलक्षण अनुभव देते. ह्या आकर्षणात जननशक्तीचे गूढही दडलेले आहे. ज्या अनुभवाला दिव्यत्वाचा स्पर्श आहे त्याच्यामागे देव आहे; हा अनुभव त्या देवांचा प्रसाद आहे. ज्ञानाला दिव्यत्वाचा स्पर्श आहे. ज्ञान भगवती सरस्वतीचा प्रसाद आहे.

हे खरेखुरे देव आहेत की काही प्रेरणांना, साफल्याच्या अनुभवांना देवांचे रूप दिले आहे? ह्या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही कारण हा प्रश्नच उद्भवत नाही. पण हे देव आणि राम-कृष्ण ह्यांच्यात स्वरूप-भेद आहे. राम-कृष्ण हे रक्तामांसाचे देव आहेत, ही खरीखुरी माणसे होती आणि अनेक पिढ्यांनंतर, माणसांत आणि त्यांच्यात पुरेसे अंतर निर्माण झाल्यावर त्यांना देव बनविले असे असेल का? हा पुरातत्त्ववेत्त्यांचा प्रश्न आहे असे असेलही. पण त्यांना देव बनविल्यानंतर त्यांचे तर्कशास्त्र उफराटे बनते. एकदा ते देव बनले की

मग ते माणसांचे देव बनले असे म्हणता येत नाही. मग त्या देवांनी, (किंवा कोणत्यातरी देवाने) राम, कृष्ण असे अवतार घेतले असे म्हणावे लागते. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली की तिची किंमत करता येत नाही.

जे रामाची उपासना करतात ते राम ह्या देवाची उपासना करतात. ह्या देवाला रामाचे माणूसपण चिकटलेले असते की नाही ? असते आणि नसतेही. तो कौसल्येचा मुलगा असतो, भरताचा थोरला भाऊ असतो, सीतापती असतो, राक्षसचमूचा संहारकर्ता, वालीचा कपटाने वध करणारा, पतिव्रता पत्नीचा अन्यायाने त्याग करणारा, शंबूकाला नाहक ठार करणारा इ. सर्व काही असतो. रामाचे स्मरण करताना ह्या सर्व चरित्राचे स्मरण होतेच. नाहीतर रामाचे स्मरण झाले असे होणार नाही. पण हे सर्व असूनही राम हे विश्वतत्त्वही आहे. ' रामान्नास्ति परायणं परतरम् । '

रामाच्या लौकिक चरित्रातून पुरुषार्थसिद्धीचे, कर्तव्यपालनाचे आदर्श भक्ताला लाभतील. पण रामचरित्र आदर्श आहे असे मानले तर वालीच्या वधाचे काय ? सीतात्यागाचे काय ? शंबूकवधाचे काय ? हे रामाच्या चरित्रावरील डाग आहेत की नाहीत ? ह्याचे सरळ उत्तर आहेत असेच असू शकेल. पण म्हणून ' ह्या रामाची उपासना तुम्ही कशी करता ? ' हा प्रश्न उद्‌भवत नाही. उपासना राम ह्या देवाची असते. समजा, रामाचे चरित्र पूर्णपणे निष्कलंक असते. तरी त्याची उपासना होऊ शकणार नाही. कारण माणसाची उपासना होऊ शकणार नाही. विशुद्ध चारित्र्याचा माणूसही उपास्य होऊ शकत नाही कारण तो देवत्वाच्या मानदंडाने कितीतरी तोकडा असणार. देव परात्पर आहे. तो अनंतकल्याणगुणनिधान आहे. सर्वश्रेष्ठ माणूसही सान्त असतो.

जे रामाला केवळ माणूस मानतात ते रामाच्या चारित्र्याची नैतिक चिकित्सा करू शकतात. ह्या चारित्र्याची एक धीरोदात्त, आदर्शवत् अशी बाजू आहे आणि रामाच्या आयुष्यात ती प्रधान बाजू आहे. पण ह्या आयुष्यात स्खलनेही आहेत. आणि हे प्रसंग कलंकरूप आहेत. रामचरित्राचे नैतिक मूल्यमापन असेच होऊ शकेल. जे रामाला देव मानतात ते रामाच्या मानवी रूपाशी संबंधित असलेले पण या मानवी रूपाने अस्पर्श असलेले त्याचे देवरूप पाहतात. रामावताराच्या चरित्रापासून त्यांना आदर्श मिळतात आणि ह्या चरित्रावर जे डाग आहेत ते त्यांच्या दृष्टीने गूढ राहतात. हे खरेखुरे गूढ आहे. ह्या दुष्कृत्यांचे दृश्य असलेले रूप आहे. पण त्यांच्यात अदृश्य असलेला पण जाणवणारा असा अर्थ भरलेला आहे.

काय अर्थ असेल ? जे मानवी आहे ते कलंकित, मायामलिन असणारच. जोपर्यंत तुम्ही प्रपंचात आहात तोपर्यंत प्रसंगी दृष्कृत्ये आपद्धर्म म्हणून करावी लागतील. ती दुष्कृत्ये आहेत हे भान सुटता कामा नये. रामालाही ह्या दुष्कृत्यांचे परिणाम भोगावे लागतील. कर्मापासून कुणाची सुटका नाही. माणूस झालेला देव असला तरीही नाही. धर्माचे तत्त्व दैवी अवतारांच्याही पलीकडचे आहे. देव माणूस झाला तरी देव राहतो. विश्व ही त्याची लीला आहे आणि ह्या लीलेत चांगले आणि वाईट यांची स्थाने काय आणि प्रयोजन काय हे ज्ञान देवालाच असते. रावण उन्मत्त होता. त्याने अनाचार केले आणि रामाने त्याचा वध केला. राम आणि रावण यांचे वैर दृश्य होते. पण रावण मेल्यावर त्याची प्राणज्योत रामात प्रविष्ट झाली. जगात पाप का आहे हे ईश्वर जाणे. पण एक गोष्ट स्पष्ट आहे. पाप हे पाप आहे आणि धर्म हा धर्म आहे.

जो हिंदू धार्मिकतेच्या प्रवाहात आहे त्याला देवाच्या अवतारांची सर्व छिद्रे माहीत असतात. आधुनिक सुशिक्षित हिंदूंना खडतर संशोधन केल्याने जी माहिती होते आणि त्यांनी लिहिलेले विद्वज्जड ग्रंथ वाचून परभृत आधुनिकांना जी माहिती होते ती खेडवळ माणसांच्या नेहमीच्या बोलण्यात, ते देतात त्या दृष्टांतांत, त्यांच्या म्हणींत, वाक्प्रचारांत भरलेली असते. ते देवांची टिंगलही करतात आणि त्यांना भक्तीने भजतातही. त्यांचे देव त्यांच्याजवळ वावरत असतात आणि दुष्प्राप्यही असतात.

देवाची सेमिटिक कल्पना वेगळी आहे. प्रारंभी देव एका गणाचा ( ट्राइब ) असूयाग्रस्त देव होता. मीच केवळ ह्या गणाचा देव आहे आणि माझ्या गणाने इतर देवांच्या मागे जाता कामा नये असा त्याचा आग्रह होता. पुढे एकेश्वरवादी कल्पना प्रभावी झाली तेव्हा खरा देव एकच आहे, त्याच्याहून वेगळे असलेले देव खोटे देव आहेत हे तत्त्व स्वीकारण्यात आले. देव आणि इतर यांच्यात अनंत अंतर पडले. जो खरा देव

अनुक्रमणिका

आहे त्याचे स्वरूप केवळ शुद्ध आहे, केवळ आध्यात्मिक आहे, पार्थिवतेचे मालिन्य त्याच्या ठिकाणी असू शकत नाही असा सिद्धांत स्वीकारण्यात आला. ईश्वराचे स्वरूप जगात व्यक्त होत नाही, जगात दिव्य असे काही नाही, जग आणि जीवात्मे ही ईश्वराची त्याच्यापासून अलग असलेली निर्मिती आहे हा ह्या सिद्धांतापासून निष्पन्न होणारा निष्कर्ष आहे. ( हिंदूंच्या दृष्टीने जमीन, आकाश, वनस्पती, प्राणी, माणसे ही दिव्य आहेत. ह्या देवता आहेत.)

ह्यामुळे सेमिटिक धर्मपंथांत अवतार नाहीत. देवाने प्रेरित केलेले आणि देवाचा संदेश प्रकट करणारे प्रेषित आहेत. इस्लाममध्ये देवाची ही संकल्पना अत्यंत तर्ककठोर स्वरूपात प्रकट झाली आहे. 'अल्लाशिवाय देव नाही.' ख्रिस्ती धर्माने तडजोड पत्करली आहे. येशू हा मानवपुत्र आहे आणि देवही आहे. तो देवाचा अंश नाही किंवा देवाच्या स्वरूपाचे एक अंग नाही. तो देवच आहे. पण येशू हा देवाचा एकच अवतार आहे. शुद्ध चैतन्याला पार्थिव रूप धारण करावे लागते असा हा विचार आहे. त्याच्यामागे ग्रीक तत्त्वज्ञान आहे. ह्यामुळे ख्रिस्ती धर्माला अद्वैताचे अंग आहे. येशू म्हणतो, "आणि त्या दिवशी तुम्हाला असे आढळेल की मी माझ्या पित्यात आहे, आणि तुम्ही (माणसे) माझ्यात आहात आणि मी तुमच्यात आहे."

पण हे अंग गौण आहे. केवळ येशू ईश्वराचा एकमेवाद्वितीय असा अवतार आहे. ह्यामुळे येशूच्या मानवतेवर कितीही भर दिला तरी येशू अखेरीस देव राहतो.

ख्रिस्ती मिशनऱ्यांना देवदेवतांविषयीच्या कल्पनांनी धक्काच बसला. देवाशी लडिवाळपणे वागणारे हे लोक देवाला न्हाऊ घालतात, खाऊ घालतात, झोपवतात आणि जागे करतात, चोऱ्या करणाऱ्या आणि गोपीशी व्यभिचार करणाऱ्या देवाची उपासना करतात हे सर्व त्यांना अजब, घृणास्पद वाटले. ते सुशिक्षित होते. ग्रीक साहित्य त्यांना अवगत होते. झ्यूस आणि हेरा, अथीनी आणि अ‍ॅफ्रोडाइट या ग्रीक देवतांच्या अनाचारांची माहिती त्यांना होती. पण ह्या सर्व देवता आता हटल्या होत्या, कविकल्पना, प्रतीके एवढेच स्थान त्यांना उरले होते आणि त्यांच्या संप्रदायांची जागा खऱ्या देवाच्या शुद्ध उपासनेने घेतली होती. भारततही असे व्हावे असे त्यांना वाटत होते आणि असे होईल अशी खात्री होती.

खोटया देवांची जागा खऱ्या देवाने घ्यायची असेल तर खोटया देवांचे खोटेपण सिद्ध करणे आवश्यक होते आणि हे फारसे कठीण नव्हते. खरा देव पूर्णपणे शुद्ध असला पाहिजे. तेव्हा जो कुणी अनैतिक कृत्य करतो तो खरा देव असणार नाही. राम, कृष्ण इत्यादी कथित देवांनी अनैतिक कृत्ये केली आहेत. तेव्हा ते खरे देव नाहीत. हा त्यांच्या दृष्टीने अमोघ युक्तिवाद होता. अनेकांना तो पटला आणि ते ख्रिस्ती झाले. अनेकांना तो पटूनही ते ख्रिस्ती झाले नाहीत. पण त्यांनी निर्मिक किंवा ह्या प्रकारच्या शुद्ध देवाची स्थापना पारंपरिक देवांच्या जागी केली. हा युक्तिवाद प्राचीन आहे. प्लेटोने त्याचा प्रथम वापर केला.

पण प्लेटोच्या युक्तिवादाने ग्रीक संप्रदाय हटले नाहीत. आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या युक्तिवादानेही ते हटले नाहीत. ते अखेरीस हटले ह्याची कारणे वेगळी आहेत. (हटले तरी ख्रिस्ती चर्चला त्यांनी आपले योगदान दिले. स्थानिक देव संत म्हणून चर्चने स्वीकारले.)

आणि सर्वसामान्य हिंदू ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या हल्ल्याने विचलित झाले नाहीत किंवा बिथरले नाहीत. कारण ज्या देवाची उपासना आपण करतो त्याच्या अनेकांगी स्वरूपाचे ज्ञान त्यांना होते. ज्या धार्मिक परंपरेत ज्ञानेश्वर आणि तुकाराम उदयाला आले आणि सर्वमान्य झाले त्या परंपरेतील लोकांना शुद्ध, खऱ्या देवाची कल्पना द्यायची वल्गना कुणी करू नये.

राम धनुर्धर होता, क्षत्रिय होता, राक्षसांचा वध करीत होता, म्हणजे हिंसा करीत होता. तो मोक्षमार्गी नव्हता. धर्म, अर्थ आणि काम हे त्याचे पुरुषार्थ होते. (पण तो देव होता म्हणून मुक्तही होता.) गांधी आजन्म मोक्षमार्गी होते. स्थितप्रज्ञ होण्यासाठी त्यांची साधना होती. मोक्षमार्गी अहिंसाधर्म त्यांनी पाळला. इतकेच नव्हे तर प्रापंचिक व्यवहारात अहिंसाधर्माला मूलभूत स्थान देण्याचा निकराचा प्रयत्न केला. आणि तरीही राम हे त्यांचे आराध्य दैवत राहिले. जर कुठे कोडे असेल तर ते येथे आहे. हे कोडे ज्याला सुटेल त्याला इतर कोडी भेडसावणार नाहीत. सर्वसामान्य हिंदू जनतेला ती भेडसावीत नाहीत.

⊙ ⊙ ⊙

# नोबेल पारितोषिके : १९८७

अशोक नारायण ठाकूर

एकूण मानवजातीच्या भल्यासाठी करण्यात येणारे मूलभूत संशोधन, क्रांतिकारक शोध, असामान्य बुद्धिमान माणूस व त्याचे कार्य यांना आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यता देण्याच्या हेतूने नोबेल पारितोषिके देण्यात येतात. मात्र हे पारितोषिक प्रत्यक्षात राष्ट्रीय सन्मानाचे चिन्ह मानले जाऊ लागले आहे. उदाहरणार्थ, विशेषत: पाश्चात्त्य विद्यापीठे आपल्या विद्यापीठात किती नोबेल पारितोषिकविजेते आहेत हे अभिमानाने सांगत असतात. या वर्षीच्या अशा पारितोषिकांची काही वैशिष्टये आहेत.

भौतिकीच्या पारितोषिकपात्र संशोधनाची प्रसिद्धी व या पारितोषिकाची घोषणा यांमध्ये किमान कालावधी असण्याचा या वर्षी उच्चांक झाला आहे. म्हणजे या संशोधनाचा अहवाल पारितोषिक जाहीर होण्यापूर्वी केवळ १३ महिने आधी प्रसिद्ध झाला होता. शांततेच्या पारितोषिकाच्या बाबतीतही असेच झाले आहे; पण निदान त्यात तसे होणे शक्य असतेही. उलट अर्थशास्त्र व रसायनशास्त्र यांच्या पारितोषिकासाठी सुमारे ३० वर्षांपूर्वीचे संशोधन विचारात घेतले आहे. भौतिकीच्या पारितोषिकाचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे हे पारितोषिक स्वित्झर्लंडमधील झुरिच संशोधन प्रयोगशाळेतील संशोधकांना व तेही स्विस-जर्मन संशोधकांच्या जोडीला मिळण्याचे हे लागोपाठचे दुसरे वर्ष आहे. कारण गेल्या वर्षी हे अर्धे पारितोषिक याच प्रयोगशाळेतील हाइन्रिख रोहरर (स्वित्झर्लंड) व गेर्ट बिनिंग (प. जर्मनी) यांना मिळाले होते (उरलेले अर्धे पारितोषिक प. जर्मनीतील एर्न्स्ट रूझिच्का यांना मिळाले होते).

रसायनशास्त्राच्या पारितोषिकाच्या बाबतीत एक मजेशीर घोटाळा झाला. या पारितोषिकाचे मानकरी आहेत डोनाल्ड जे. क्रॅम व फोन करण्यात आला कॅलिफोर्नियातील अल्टाडेना येथील डोनाल्ड ओ. क्रॅम यांना. त्यांना जेव्हा रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक



मिळाल्याचे सांगण्यात आले, तेव्हा ते चक्रावून गेले व हा तद्दन मूर्खपणा आहे, असेच त्यांना वाटले. कारण ते स्वत: जरी रसायनशास्त्राचे पदवीधर असले, तरी ते रग व गालिच्यांच्या साफसफाईचा व्यवसाय करतात. सुदैवाने स्विडिश अकादमी ऑफ सायन्सेसच्या लक्षात आपली चूक लगेच आली. खऱ्या विजेत्या क्रॅम यांना जेव्हा 'रॉंग नंबर'ची ही गफलत समजली तेव्हा त्यांनी पुढीलप्रमाणे मल्लीनाथी केली : "गालिच्यांची साफ-सफाई करण्याच्या कामातही रसायनशास्त्राचा संबंध येतोच ना !"

जपानी जीववैज्ञानिक सुसुमू तोनेगावा यांना शरीर-क्रियाविज्ञानाचे नोबेल पारितोषिक मिळाल्यामुळे जपान-मध्ये एक वेगळयाच प्रकारची चर्चा सुरू झाली असून भारत व पाश्चात्त्येतर देशांतील राष्ट्रीय संशोधन-विषयक धोरणाच्या दृष्टीनेही ती लक्षणीय आहे. जपानमधील संशोधन संस्था-संघटनांमधून संशोधनाचे काम सेवाज्येष्ठतेनुसार चालते. यामुळे कनिष्ठांचे काही संशोधन अशा ठिकाणी दडपले जाते, अशी टीका तेथील वर्तमानपत्रांतून होत आहे. भारतात जन्मलेले व जपानमध्ये काम करीत असलेले एक शास्त्रज्ञ म्हणतात, की, तेथील संशोधनविषयक वाता-वरण 'गुदमरून टाकणारे' आहे; तसेच इतर प्रयोग-शाळांतील संशोधकांशी चर्चा करणे हा गुन्हा मानला जातो, हे तर कसेतरीच वाटते. तोनेगावा यांनी हे संशोधन ३० ते ४० वयाचे असताना केले असून त्या वयात ते जपानमध्ये प्राध्यापक होऊ शकले नसते. यामुळेच तोनेगावा जपामधून वीस वर्षांपूर्वी बाहेर पडले असून ज्यांना आपल्या आवडीचे व आपल्या पद्धतीने संशोधन करायचे आहे, त्या संशोधकांनी परदेशी जावे असे ते सुचवितात. भारतातील संशोधनविषयक वातावरणही काहीसे असेच असून येथील चौकटीत बांधलेले संशोधनविषयक धोरण संशोधनाला पोषक न

अनुक्रमणिका

दाटल्याने नोबेल पारितोषिकविजेते चंद्रशेखर सुब्रह्मण्यत व हरगोविंद खुराणा यांनी आपल्या आवडीचे संशोधन करण्यासाठी अमेरिकेत जाण्याचा मार्ग निवडला. पाश्चात्त्य देशांतील संशोधनविषयक वातावरण असे नाही. यूरोप-अमेरिकेतील वैज्ञानिकांकडून कठोर परिश्रमाची अपेक्षा ठेवण्यात येते कारण तेथे मत्सराशिवाय स्पर्धा असते, हेव्याविना महत्त्वाकांक्षा असते आणि शत्रुत्वाविना समाधान असते. भौतिकीच्या नोबेल पारितोषिकाचे गेल्या वर्षीचे विजेते बिनिग व रोहरर तसेच या वर्षीचे विजेते कार्ल म्यूलर हे इंटरनॅशनल बिझिनेस मशिनचे ( आयबीएमचे ) फेलो असून अशा फेलोंना स्वतःच्या आवडीच्या संशोधन प्रकल्पाचा ५ वर्षांपर्यंत पूर्णवेळ पाठपुरावा करण्याची परवानगी देण्याचे धोरण या कंपनीने आखले आहे. तर या वर्षीच्या रसायनशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाच्या मानकऱ्यांपैकी चार्ल्स जे. पेडरसेन हे आपल्या कंपनीने पारितोषिकपात्र संशोधनासाठी नऊ वर्षांचा अवधी आपल्याला दिल्याचे आवर्जून सांगतात.

### भौतिकी

कार्ल अलेक्स म्यूलर ( स्वित्झर्लंड, ६० ) व योहानेस गेओर्ख वेडनोर्झ ( प. जर्मनी, ३८ ) हे या वर्षीच्या भौतिकीच्या नोबेल पारितोषिकाचे संयुक्त विजेते असून अतिसंवाहक म्हणजे रोध न करता वीज वाहू देण्याचा गुणधर्म अंगी असलेली पूर्णतया नवीन द्रव्ये शोधून काढल्याबद्दल त्यांना हे पारितोषिक देण्यात आलेले आहे. हे दोघे आयबीएम झुरिच संशोधन प्रयोगशाळेत संशोधन करीत असून त्यांनी ही नवीन अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्ये शोधून काढून अभूतपूर्व कामगिरी केली आहे. म्हणून नोबेल समिती म्हणते : " या त्यांच्या शोधामुळे संशोधनाची व तंत्रविद्येची नवी क्षेत्रे खुली झाली आहेत. " पारितोषिक जाहीर करताना या समितीचे एक सदस्य एरिक कार्लसन यांनी पत्रकारांना एक प्रयोगही करून दाखविला. त्यांनी या दोघांनी शोधून काढलेल्या अतिसंवाहक द्रव्यावर एक चुंबक अधांतरी तरंगत ठेवून दाखविला. याचा अर्थ त्यांनी चुंबकाखालील द्रव्याकडून विजेच्या प्रवाहाला रोध होत नाही हे दाखवून दिले. नंतर ते म्हणाले : " अतिसंवाहक द्रव्यांचा उपयोग करून अत्यंत अचूक अशी नवीन मापक उपकरणे बनविता येणे शक्य होईल; तसेच संगणकाच्या स्मृतीची क्षमता वाढू शकेल आणि एकूण संगणक तंत्रविद्येत मोठी प्रगती होऊ शकेल. " वेडनोर्झ यांचे एक सहकारी हान्स रूडोल्फ ओट आपली प्रतिक्रिया व्यक्त करताना म्हणाले : " अशा प्रकारचा शोध अर्धशतकातून केवळ एकदाच लागतो. " त्यांच्या या शोधामुळे १९८६ नंतरचा काळ हा घन अवस्था भौतिकीच्या दृष्टीने अत्यंत खळबळ उडवून देणारा ठरला व या पारितोषिकामुळे त्यावर जणू कळसच चढला. अशा तऱ्हेने अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्ये हे या दशकातील सर्वांत लक्ष्यवेधी असे संशोधनक्षेत्र पुढे आले आहे.

अतिसंवाहकता हा भौतिकीमधील एक सर्वाधिक लक्षणीय आविष्कार आहे व १९११ पासून तो माहीत आहे. एकूण विज्ञान व तंत्रविद्येच्या दृष्टीनेही अतिसंवाहकता महत्त्वाची असून तिचे अमर्याद उपयोग होऊ शकतात. असे द्रव्य पुष्कळच कमी तापमानापर्यंत थंड केले असता त्यातून अचानकपणे कोणताही रोध न होता वीजप्रवाह वाहू शकतो; म्हणजे द्रव्य अतिसंवाहक होते व या विशिष्ट तापमानाला त्या द्रव्याचे ' संक्रमण तापमान ' म्हणतात. याच वेळी अशा द्रव्यात चुंबकीय क्षेत्र घुसू शकत नाही. (किंवा अंशतःच घुसते) व या आविष्काराला 'माइसनर परिणाम ' म्हणतात. आतापर्यंत अतिसंवाहकता अतिशय कमी तापमानाला मिळविता येऊ शकत असे व हे तापमान मिळविण्यासाठी हीलियम वायूपासून बनविलेला द्रव वापरावा लागत असे. हा वायू – २६९° सेल्सियस ( किंवा ४ के ) इतक्या कमी तापमानाला द्रवरूप होतो. मात्र हीलियम हा तसा कमी प्रमाणात आढळणारा दुर्मिळ वायू आहे; तसेच द्रवरूप हीलियम तयार करणे व हाताळणे हे गुंतागुंतीचे व अत्यंत खर्चाचे काम आहे. शीतनक म्हणजे थंड करणारा पदार्थ म्हणून केवळ हाच द्रव वापरावा लागत असल्याने अतिसंवाहक द्रव्यांचा उपयोग अगदी मर्यादित ठिकाणीच करता येऊ शकतो आणि अशा द्रव्यांचे काही उपयोग फक्त कागदावरच राहिले आहेत. त्यामुळे याहून अधिक वरच्या तापमानाला अतिसंवाहक असणारी द्रव्ये शोधून काढणे हे संशोधकांचे दीर्घकाळापासूनचे स्वप्न होते. ते प्रत्यक्षात आणण्याचे प्रयत्न पुष्कळजणांनी केले असून यात अतिशय सावकाशपणे प्रगती होत गेली. १९७३ साली –२५०° सेल्सियस ( किंवा २३ के ) तापमानाला अतिसंवाहक होणारा

अनुक्रमणिका

मिश्रधातू बनविण्यात आला. तदनंतर दहा वर्षे अतिसंवाहकतेच्या संशोधनात प्रगती झाली नाही व १९८३ साली या दोघांनी मिश्र ऑक्साइडांमध्ये अतिसंवाहकता शोधण्यास सुरुवात केली.

अतिसंवाहकतेला दीर्घ म्हणजे पाऊण शतकाचा इतिहास आहे. हा गुणधर्म डच भौतिकीविज्ञ हाइके कामर्लिंग-ऑनेस यांना पाऱ्यामध्ये सुमारे ४ के (– २६९° सेल्सियस) तापमानाला प्रथमच आढळला व त्याबद्दल त्यांना १९१३ साली भौतिकीचे नोबेल पारितोषिकही मिळाले. अतिसंवाहकतेशी निगडित असलेला माइसनर परिणाम १९३३ साली प्रथम लक्षात आला. अतिसंवाहकता का व कशी उद्‌भवते हे जाणून घेण्याचे प्रयत्न अनेकांनी केले; पण १९५० सालापर्यंत यात काही यश आले नाही. त्या वर्षी जॉन बर्लिन, लेऑं कूपर व रॉबर्ट श्रीफर यांनी याविषयीचा पटेल असा एक सिद्धांत मांडला व त्यांच्या आद्याक्षरावरून तो ' बीसीएस सिद्धांत ' म्हणून ओळखला जातो. त्याबद्दल या तिघांना १९७२ साली भौतिकीचे नोबेल पारितोषिक मिळाले. (हा सिद्धांत व अतिसंवाहकतेविषयीची अधिक तपशीलवार माहिती 'नवभारत'च्या सप्टेंबर-ऑक्टोबर १९८७ अंकात आलेली आहे). १९६०–७० या दशकात ब्रियान जोसेफसन ( १९७३ सालच्या भौतिकीच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी ) यांनी अतिसंवाहकतेविषयी संशोधनात प्रगती घडवून आणली. अतिसंवाहक व सर्वसाधारण द्रव्यांमधील संपर्कबिंदूंमधून पलीकडे जाणाऱ्या इलेक्ट्रॉनांविषयी (वीजप्रवाहाविषयी) च्या या विकासाला 'जोसेफसन परिणाम' म्हणतात. यामुळे अडथळ्याचा ' मधून ' कण कसे जाऊ शकतात व द्रव्याचे तरंग कसे आंतरक्रिया करतात यांविषयी पुष्कळ माहिती झाली.

या काळात अतिसंवाहक द्रव्यांचा उपयोग करून घेण्याचे प्रयत्न आले. उदाहरणार्थ, कर्णवेगवर्धक व इतरत्र लागणाऱ्या मोठ्या शक्तिशाली चुंबकांमध्ये या द्रव्यांची वेटोळी वापरतात. विद्युतजनित्रे, ऊर्जा साठविण्याची साधने इत्यादींत अतिसंवाहक द्रव्यांचा वापर करून घेण्यात आला. वस्तू चुंबकीय ' गिरदी'वर 'तरंगू ' शकते, याचाही वेगवान आगगाड्या व काही उपकरणे यांत उपयोग करून घेण्यात येत आहे. तसेच इलेक्ट्रॉनिकी व तत्संबंधित स्विचे आणि संगणकाचे स्मृतिघटक यांमध्येही अतिसंवाहक द्रव्यांचा उपयोग करून घेण्याच्या योजना आहेत.

मृत्तिकाद्रव्ये सामान्यपणे कोठी तापमानाला निरोधक (म्हणजे वीजप्रवाहाला रोध करणारी) द्रव्ये म्हणून वापरली जातात. तथापि काही भौतिकीविदांनी ही द्रव्ये त्यांच्या वैशिष्टयपूर्ण रचनेमुळे अतिसंवाहक होऊ शकतील असे सुचविले होते (उदाहरणार्थ, १९७३ साली जॉन्स्टन, प्रकाश, झाकरियासेन व विश्वनाथन यांनी लिथियम व टिटॅनियमयुक्त अतिसंवाहक ऑक्साइडाचा उल्लेख केला होता आणि यातील तीन प्रावस्थांपैकी स्पायनेल प्रावस्था अतिसंवाहक होती) त्यामुळे या द्रव्यांविषयी म्यूलर हे विचार करीत होतेच. १९८३ साली एर्प्रिस (इटली) येथे एका परिषदेला ते गेले होते तेव्हा एका मठाच्या उद्यानातून फेरफटका मारताना त्यांना या शोधाची कल्पना स्फुरली. आपले संशोधन सीमित करण्यासाठी त्यांनी निकेल व तांबेयुक्त ऑक्साइडांवर लक्ष केंद्रित करायचे ठरविले. या ऑक्साइडात एखादे विरलमृत्तिका मूलद्रव्यही असावे असाही त्यांचा विचार होता. या कामात त्यांनी कुशलतेने प्रयोग करणाऱ्या बेडनोर्झ यांची मदत घेतली. निरनिराळी मृत्तिकाद्रव्ये शोधून पाहाण्यात आली; पण दोन वर्षे त्यांना यात यश आले नाही. याच सुमारास फ्रान्समधील कान विद्यापीठातील बेर्नार रेव्हू व त्यांच्या सहकाऱ्यांनी एक प्रबंध वाचला होता; त्यात लँथनम-बेरियम-तांबे ऑक्साइडाच्या संश्लेषणाचे वर्णन केले होते. म्यूलर व बेडनोर्झ यांनी या संयुगाचे संश्लेषण करण्याचे ठरविले व त्यांना त्यात यश आले. यांची पद्धती कान येथील तुकडीच्या पद्धतीपेक्षा थोडीशी वेगळी होती. तीमुळे त्यांना शुद्ध संयुगाऐवजी त्याच्या प्रावस्थांचे (प्रकारांचे) मिश्रण मिळाले. यांपैकी एक प्रावस्था ३५ के (– २३८° सेल्शियस) तापमानाला अतिसंवाहक होत असल्याचे २७ जानेवारी १९८६ रोजी प्रथम बेडनोर्झ यांना आढळले. नंतर दोघांनी या द्रव्याचे शुद्धीकरण केले व त्याचे चुंबकीय गुणधर्म तपासून एप्रिल १९८६ मध्ये त्याच्या अतिसंवाहकतेविषयी खातरजमा करून घेतली. आणि Zeitschrift fur Physik–B या नियतकालिकाच्या सप्टेंबर १९८६ अंकात हे संशोधन प्रसिद्ध झाले.

अशा तऱ्हेने त्यांनी विविध संघटनांचे मिश्रधातू ही परंपरागत 'अतिसंवाहक' द्रव्ये बाजूला सारून

जवळजवळ निरोधक अशा मृत्तिकाद्रव्याकडे आपले लक्ष वळविले ही या दोघांची अतिशय महत्त्वाची कामगिरी ठरली. कारण तीमुळे अतिसंवाकतेच्या प्रगतीमधील एक मोठा अडथळा पार केला गेला. याविषयी बेडनोर्झ म्हणतात : " अतिसंवाहक द्रव्यांच्या संशोधनात आम्ही नवखे वा परके असल्याने आम्ही अपरंपरागत कल्पनांचा पाठपुरावा करू शकत होतो ". अशा तऱ्हेने संशोधन करताना मळलेल्या वाटेने न जाता नवीन मार्ग चोखाळण्याची धमकही त्यांनी दाखविली. कारण या संयुगांच्या बाबतीत तांबे वा निकेल यांच्या अणूंना इलेक्ट्रॉन वाहून न्यायला लावता येऊ शकेल, अशी खूणगाठ त्यांनी मनाशी बांधली होती. अशा तऱ्हेने अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्यांच्या शोधात हे दोघे उठून दिसतात. तदनंतर अशी द्रव्ये व तीही अधिकाधिक उच्च तापमानाला अतिसंवाहक होणारी द्रव्ये शोधून काढण्याची जणू लाटच उसळली असून ९० ते ९८ के एवढ्या उच्च तापमानाला अतिसंवाहक असणारी मृत्तिकाद्रव्ये इतरांनी त्यांच्यामागून येऊन शोधून काढली असून आता आपण कोठी तापमानाला अतिसंवाहक असणारी द्रव्ये शोधून काढण्याच्या उंबरठ्यावर येऊन पोचलो आहोत, असे दिसते आहे. असे असले तरी यामागे या दोघांचे प्रेरणादायक संशोधन होते. सुदैवाने या दोघांच्या निष्कर्षाची खातरजमा टोकियो विद्यापीठातील सोजी टनाका यांच्या गटाने लगेचच करून घेतली. तदनंतर जगातील शेकडो प्रयोगशाळांतून अशाच द्रव्यांवरील संशोधनकार्याला वेग आला व सध्या जगात सुमारे ५००० संशोधक या कामात गुंतले आहेत. आणि यातील घोडदौड अजून थांबलेली दिसत नाही.

ह्यूस्टन विद्यापीठातील पॉल च्यू यांची तुकडी, चीनच्या वैज्ञानिक अकादमीतील संशोधकांचा गट, बेल प्रयोगशाळेतील संशोधकांची तुकडी, दिल्लीच्या नॅशनल फिजिकल लॅबोरेटरीतील संशोधकांचा गट येथील संशोधकांना अधिक उच्च संक्रमण तापमानाची अतिसंवाहक द्रव्ये आढळली आहेत. पैकी पॉल च्यू न चिनी तुकडीला ९० के संक्रमण तापमानाचे द्रव्य बऱ्याच आधी सापडले होते. त्यामुळे या पारितोषिकात्ते पॉल च्यू हेही एक भागीदार असायला हवे होते, असे अनेकांना वाटते. तथापि इतरांना असे वाटते की च्यू यांचे कार्य ही तंत्रविद्येतील प्रगती आहे. म्हणणे ते काही मूलभूत स्वरूपाचे वैज्ञानिक संशोधन नाही. नोबेल समितीची निवड मात्र अधिक व्यावहारिक दिसते. तीमुळे च्यू यांचे संशोधन आधी की चिनी तुकडीचे आधी हा वाद टाळला गेला. शिवाय च्यू यांचे संशोधन हे नोबेल पारितोषिकासाठी नावे सुचविण्यासाठी असलेल्या अंतिम तारखेनंतर प्रसिद्ध झाले आहे.

या मृत्तिकाद्रव्यात अतिसंवाकता कशी येते, हे अजून समजलेले नाही. तिचे स्पष्टीकरण करण्यासाठी बीसीए सिद्धांत पुरेसा ठरेल की नवीनच सिद्धांत मांडावा लागेल, हे अजून ठरायचे आहे. या द्रव्यांचे किती विस्तृत उपयोग होऊ शकतील, याविषयी अंदाज करणेही अकालीच ठरेल. मात्र विद्युततंत्रविद्या, सूक्ष्म इलेक्ट्रॉनिकी व मापन तंत्रविद्या या क्षेत्रांतील संशोधक या द्रव्यामध्ये अतिशय रस घेऊन कार्य करीत आहेत, हे उघड दिसते. सध्या उपलब्ध झालेली अशी द्रव्ये बऱ्याच उच्च तापमानाला अतिसंवाहक होत असल्याने ती वापरणे अधिक सोयीस्कर होईल. कारण ती थंड करण्यासाठी ७७ के तापमानाचा द्रवरूप नायट्रोजनसुद्धा वापरता येईल आणि द्रवरूप नायट्रोजन हा द्रवरूप हीलियमपेक्षा अधिक सहजी उपलब्ध असून तो स्वस्त पडतो, अधिक कार्यक्षम आहे व हाताळण्यासाठी सोपा आहे. अशा प्रकारे ही अतिसंवाहक द्रव्ये पुढील ठिकाणी वापरणे शक्य होईल : चुंबकीय गिरदीवरून धावणाऱ्या वेगवान आगगाड्या, अधिक छोटे पण अधिक वेगवान महासंगणक, अधिक शक्तिशाली प्रतिमाकरण वैद्यकीय यंत्रे, वीज साठवावयाच्या यंत्रणा, खास प्रकारच्या विद्युत मोटारी, कार्यक्षमपणे चालणारी जनित्रे, शंभर टक्के कार्यक्षम विद्युतप्रेषण तारा वगैरे. अशा प्रकारे या नवीन अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्यांमुळे वैज्ञानिक, तंत्रवैज्ञानिक व आर्थिक क्षेत्रांत मोठी क्रांती घडून येईल, असे भौतिकीविदांना वाटू लागले आहे. विजेच्या कोणत्याही उपकरणाच्या व प्रयुक्तीच्या दृष्टीने अतिसंवाहक द्रव्य हे आदर्श असे द्रव्य आहे. त्यामुळे विजेच्या तंत्रविद्येत नवे युग येत आहे, असे शास्त्रज्ञ म्हणू लागले आहेत. या दोघांनी हा शोध एका छोट्या खोलीत व स्वस्त साधनसामग्री वापरून लावलेला आहे. म्हणून एक भौतिकीविद म्हणाले : " साध्यासुध्या साधनसामग्रीचा वापर करूनही मोठे शोध लागू शकतात हेच यावरून दिसून येईल. "

डॉ. बेडनोर्झ यांचा जन्म १६ मे १९५० रोजी प. जर्मनीतील न्यूएन किरकेन येथे झाला व त्यांचे

अनुक्रमणिका

आधीचे शिक्षण म्यूएन्स्टर विद्यापीठात झाले. १९८२ साली त्यांनी ईटीएच-झेंट्रम म्हणजे स्विस फेडरल इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी या संस्थेतून पीएच्. डी. पदवी संपादन केली व त्या वर्षापासून ते तेथील आयबीएम झुरिच संशोधन प्रयोगशाळेत काम करीत आहेत. वरील संशोधनातील प्रयोग करण्याचा भार त्यांनी उचलला होता. कारण ही नवी मृत्तिकाद्रव्ये भाजून बनविण्याची व त्यांचे परीक्षण करण्याची चांगली हातोटी त्यांच्यापाशी आहे. अतिवेगवान गाडी 'हे माझे खरेखुरे स्वप्न आहे' असे ते म्हणतात.

म्यूलर यांचा जन्म २० एप्रिल १९२७ रोजी स्वित्झर्लंडमध्ये झाला. त्यांनीही वरील संस्थेतूनच भौतिकीची पीएच्. डी. संपादन केली (१९५८) असून वरील प्रयोगशाळेतच ते १९६३ पासून आहेत. आधी ते धन अवस्था भौतिकीतील संशोधन करीत होते आणि इतर संदर्भांत त्यांनी निरोधक ऑक्साइडांवरही संशोधन केलेले आहे. ते आपल्याला स्फुरलेल्या कल्पनांचा पूर्ण भरवसा ठेवून पाठपुरावा करतात. घसरजोड्यांच्या मदतीने बर्फावरून घसरत जाण्याची, भटकंतीची त्यांना आवड असून आवडीच्या कल्पनांमध्ये स्फूर्ती प्राप्त करून घेण्यासाठी व विचार करण्यासाठी त्यांना स्विस आल्प्स पर्वतावर जायला आवडते. हे पारितोषिक मिळाल्यामुळे तुम्हाला आश्चर्य वाटले का या प्रश्नावर म्यूलर उत्तरले : "आमच्या संशोधनामुळे निर्माण झालेल्या अपेक्षा पाहता एखाद्याने तशी अपेक्षा बाळगलीही असती. पण जेव्हा प्रत्यक्ष पारितोषिक मिळाल्याचे समजले तेव्हा त्यावर विश्वासच बसेना."

## रसायनशास्त्र

रॉयल स्विडिश अकादमीने या वर्षीचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक डोनाल्ड जे. क्रॅम, झां-मारी लेन व चार्ल्स जे. पेडरसेन यांना संयुक्तपणे दिले असून सजीवातील महत्त्वाच्या प्रक्रियांची (किंवा जैव द्रव्यांच्या वर्तनाची) नक्कल म्हणजे हुबेहूब अनुकरण करणाऱ्या रेणूंचे (द्रव्यांचे) संश्लेषण (कृत्रिम रीतीने तयार करणे) व वापर यांसाठी केलेल्या संशोधनाबद्दल हे पारितोषिक त्यांना मिळाले आहे. सजीवातील निसर्गदत्त प्रथिनांची कामे करणारी पण त्यांच्या मानाने कमी गुंतागुंतीची, कमी रेणुभाराची वअतिशय वैशिष्टयपूर्ण गुणधर्मांची कृत्रिम कार्बनी संयुगे त्यांनी बनविली. अशा प्रकारे रेणूंच्या रासायनिक व जीवांमधील कार्यांच्या दृष्टीने त्यांचे आकार महत्त्वाचे असतात, या कल्पनेचा उपयोग करून घेणाऱ्या क्षेत्रात या तिघांनी मूलभूत महत्त्वाचे संशोधन केले आहे. ही संशोधने १९६० च्या सुमारास करण्यात आलेली आहेत.

सजीवातील हॉर्मोने व एंझाइमे ही गुंतागुंतीची संयुगे असून त्यांचे पेशीवरील परिणाम हे प्रथम पेशीच्या रचनात्मक भागाशी बंध निर्माण झाल्यावर सुरू होतात. तत्त्वतः हे काम कुलपात किल्ली चपखलपणे बसण्यासारखे आहे. म्हणजे असे रेणू परस्परांना ओळखू शकतात आणि ज्यांच्याशी बंध निर्माण करावयाचा आहे त्या रेणूंची निवडही करू शकतात. मुख्यत्वे धन विद्युतभारित तसेच ऋण विद्युतभारित व विद्युतभाररहित रेणूही वैशिष्टयपूर्ण रीतीने व विवेचकपणे बद्ध होतील अशा तऱ्हेने त्यांनी तयार केलेल्या कृत्रिम रेणूंचा आराखडा बनविलेला आहे. त्यांनी या कृत्रिम संयुगांचे रासायनिक व भौतिकीय गुणधर्म अभ्यासले आहेत. तसेच ज्या घटकांमुळे हे रेणू एकमेकांना ओळखू शकतात व एकमेकांत कुलूप-किल्लीप्रमाणे चपलखपणे बसू शकतात, त्या घटकांचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्नही या तिघांनी केला आहे. यानुसार सजीवातील एंझाइमे ही मुळात उत्प्रेरकांप्रमाणे काम करतात म्हणजे शरीरातील क्रियांना साहाय्यक म्हणून काम करतात व त्यांच्या कार्याची नक्कल करणारे रेणू निर्माण करण्यात आले आहेत.

अशा प्रकारे या तिघांचे संशोधन हे सहसंबद्ध रसायनशास्त्र, कार्बनी संश्लेषण, वैश्लेषिक रसायनशास्त्र, वैद्यक, औद्योगिक प्रक्रिया, जीवरसायनशास्त्र या क्षेत्रांमधील प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरले आहे. आणि यामुळेच रसायनशास्त्राच्या अंतर्गत एका नव्या संशोधनक्षेत्राचा पाया घातला गेला आहे. सध्या या क्षेत्राचा विस्तार होत असून त्यात जोमाने कार्य चालू आहे. या ज्ञानशाखेला आता होस्ट-गेस्ट (यजमान-पाहुणा) रसायनशास्त्र, एक्स्ट्रा-मॉलेक्यूलर रसायनशास्त्र किंवा अधिरेणवीय (सुप्रामॉलेक्यूलर) रसायनशास्त्र असे म्हणतात. एंझाइमांशी निगडित असलेले आधारतल (म्हणजेत्यांची ज्यांच्याशी विक्रिया होते ती द्रव्ये), जैव ग्राहकाशी संबंधित संकेतद्रव्ये, प्रतिजनांशी बद्ध अशी प्रतिपिंडे व आयनोफोर या प्रतिजैव (अँटिबायोटिक) संयुगांशी बांधले गेलेले धातूंचे विद्युतभारित

अणुरेणू ही वरील प्रकारच्या रेणूंची सुपरिचित उदाहरणे आहेत. पुष्कळ जैव क्रियांच्या मुळाशी हे रेणू असतात. कारण त्यांच्या अंगी एकमेकांना ओळखण्याची व सुस्पष्ट संयुगे बनविण्याची कुवत असते. बहुतेक जैव क्रियांमध्ये अशा तऱ्हेने कमी रेणुभार असलेली एक वा अनेक संयुगे उच्च रेणुभाराच्या संयुगाच्या ( बहुतकरून प्रथिनाच्या किंवा न्यूक्लिइक अम्लाच्या) विशिष्ट भागाला बद्ध झालेली आढळतात. ही बंधने अत्यंत वैशिष्टचपूर्ण व विवेचक असून कमी रेणुभाराचे संयुग किल्लीप्रमाणे उच्च रेणुभाराच्या संयुगात चपखलपणे बसणारे असावेच लागते.

नैसर्गिक प्रथिने जी कार्ये करतात तीच कामे करणारी सापेक्षतः कमी गुंतागुंतीची कार्बनी संयुगे कृत्रिम रीतीने बनविण्याचे स्वप्न विशेषत: अकार्बनी रसायनशास्त्रज्ञ, दीर्घकाळापासून पाहात आले आहेत. १९६० नंतरच्या काळात हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने मोठा पल्ला गाठण्यात आता आहे. आणि यासाठी या तिघांचे संशोधन पायाभूत ठरले आहे.

पेडरसेन यांनी प्रथम इतर संशोधनही केलेले आहे. रबर निर्माण करताना वापरण्यात येणाऱ्या व्हॅनेडियम या उत्प्रेरकाच्या क्रियेने जे नियंत्रण होते ते कसे होते हे शोधून काढणे हे त्यांचे मूळ उद्दिष्ट होते, पण त्यांना यात यश मिळाले नाही. तथापि याच धडपडीत त्यांना विशिष्ट प्रकारची पॉलिईथरे ही संयुगे आढळली. या संयुगांच्या मध्यभागी धातूचे अणू समाविष्ट होऊ शकतात. ही संयुगे मुकुटासारखा आकार धारण करतात, असे दिसून आल्याने त्यांनी त्यांना 'क्राउन ईथरे' हे नाव दिले ( यांनाच मॅक्रोसायक्लिक पॉलिईथरे असेही म्हणतात). अशा संयुगांचे संश्लेषण करणाऱ्या पद्धतींचे वर्णन करणारी दोन पुस्तके त्यांनी लिहिली व १९६७ साली प्रसिद्ध केली. या संयुगांचे गुणधर्म वैशिष्टचपूर्ण व लक्षणीय असल्याचेही त्यांनी दाखवून दिले. ज्यांच्याबरोबर ही संयुगे जटिल संयुगे बनवितात त्या आपल्या इष्ट सहकारी घटकांना ओळखण्याची विलक्षण व एकमेवाद्वितीय अशी क्षमता त्यांच्यात आढळली ( अशा परस्परांशी निगडित संयुगांचे वर्णन १८९४ साली फिशर यांनी कुलूप-किल्ली असे केले होते). म्हणजे विविध क्राऊन ईथरांमध्ये निरनिराळचा आकारमानांची द्विमितीय 'छिद्रे' असतात व त्यांच्यामध्ये विविध धातूंचे विद्युतभारित अणुरेणू चपखलपणे बसतात आणि त्यानुसार ईथराची विवेचकता ठरते.

पेडरसेन यांच्या मूलभूत शोधावरून १९६९ साली लेन यांनी क्राउन ईथरांसारखी द्विवलयी संयुगे तयार केली व त्यांना लेन यांनी 'क्रिप्टांडे' हे नाव दिले. ही संयुगे क्राउन ईथरांपेक्षा अधिक विवेचकता दाखवितात. यांच्यात सुधारणा करून एंझाइमसदृश द्रव्ये बनविण्यात लेन यांना यश आले. अशा तऱ्हेने ॲमिनो अम्लाशी बद्ध होणारी क्राउन ईथरे व नंतर अधिकाधिक जटिल संयुगे लेन व क्रॅम यांनी विकसित केल्याने पेडरसेन यांचे कार्य व्यापक होत गेले. या संयुगांपासून जटिल संयुगे बनताना मागे त्रिमितीय चिरा व पोकळचा राहतात; त्या भेगा-पोकळचांत भिन्न आकारमानांची कमी रेणुभार असलेली संयुगे बद्ध करता येऊ शकतात. उदाहरणार्थ, हे जटिल रेणू ॲसिटिल कोलीनसारख्या साध्या कार्बनी रेणूंना विशिष्ट प्रकारे जोडले, तर ते एंझाइमांच्या क्रियांची नक्कल करतात. अशा तऱ्हेने ज्या संशोधनशाखेत विक्रिया पुढे जात राहाण्याच्या दृष्टीने तिच्यात भाग घेणाऱ्या रेणूंचा आकार मूलभूत महत्त्वाचा ठरतो, त्या संशोधन शाखेचा पाया या तिघांनी घातला आहे. या शाखेला क्रॅम होस्ट–गेस्ट रसायनशास्त्र हे तर लेन सुप्रामॉलेक्यूलर (रेणूपेक्षा अधिक गुंतागुंतीच्या वा उच्च संघटनाच्या रेणूंचे अध्ययन करणारे) रसायनशास्त्र हे नाव देतात.

विशेषत: क्रॅम यांनी आधुनिक तंत्र व माहिती यांचा वापर करून पूर्णपणे स्थिर असे यजमान (होस्ट) रेणू बनविले. हे रेणू अत्यंत उच्च निवडक्षमता असलेली खास संयुगे तयार करतात. उदाहरणार्थ, अशा प्रकारे सोडियमच्या आयनांपेक्षा (विद्युतभारित अणूंपेक्षा) लिथियमच्या आयनांशी बद्ध होण्याची ४ लाख पटींहून अधिक प्रबळ प्रवृत्ती असलेला यजमान रेणू कृत्रिम रीतीने बनविण्यात आला आहे. असे यजमान रेणू धन विद्युतभारित आयन (उदाहरणार्थ, डायझोनियम व अल्किलअमोनियम आयन); तर इतर यजमान रेणू छोटे विद्युतभाररहित वा ऋण आयन ( उदाहरणार्थ, फॉस्फेट आयन) बद्ध करू शकतात. अशा ऋण विद्युतभारित कार्बन अणुयुक्त संयुगांना कार्बनियन म्हणतात. ती अत्यंत विक्रियाशील असून कार्बनी विक्रियांमध्ये मध्यस्थ पदार्थ म्हणून अल्पकाळच टिकतात, हे शंभर वर्षांपासून माहीत आहे. मात्र या जटिल संयुगांची

निर्मिती, रचना, भौतिकीय गुणधर्म व रासायनिक विक्रिया यांचे लेन व क्रॅम यांनी तपशीलवार अध्ययन केले. त्यामुळे विक्रियांमध्ये रेणवीय विवेचकता कशी येते, हे अधिक चांगल्या प्रकारे समजणे शक्य झाले.

त्यांच्या परीक्षणांद्वारे जैव पटलांमधून आयनांच्या निवडकपणे होणाऱ्या वाहतुकीविषयीच्या माहितीतही भर पडली. याचे पुष्कळ उपयोग आधीच शोधून काढण्यात आले आहेत. उदाहरणार्थ, विविध प्रकारचे यजमान रेणू वापरून व इतर आयनांवर परिणाम होऊ न देता ऊतकांतून किरणोत्सर्गी स्ट्रॉंशियम अथवा मिक्षणांतील विषारी कॅल्शियमचे वा शिशाचे आयन काढून टाकता येणे शक्य झाले आहे. अशा प्रकारे किरणोत्सर्गी स्ट्रॉंशियम अथवा शिसे यांची विषबाधा झालेल्या घुशींना या विषबाधेतून मुक्त करण्यासाठी प्रायोगिक पातळीवर असे यजमान रेणू वापरण्यात आले आहेत. पर्यावरणाच्या संरक्षणाच्या दृष्टीनेही या रेणूंचा असा वापर करता येऊ शकेल. म्हणजे भोपाळ वायुगळतीसारख्या दुर्घटनांच्या वेळी बचाव करण्यास मदत होईल. आता तर इतक्या उच्च दर्जाची विवेचकता किंवा निवडक्षमता साध्य करण्यात आली आहे की, तिच्या मदतीने एकाच मूलद्रव्याचे भिन्न अणुभाराचे प्रकारही अलग करणे शक्य झाले आहे. यामुळे वैश्लेषिक रसायनशास्त्रात विविध प्रकारची खास विद्युतअग्रे व संवेदक रसायने बनविता आली आहेत. ठरावीक धातूंची जटिल संयुगे प्रकाशरासायनिक क्रियांमध्ये उत्प्रेरकांसारखे कार्य करतात. उदाहरणार्थ, पाण्याचे प्रकाशरासायनिक विघटन होऊन निर्माण होणारा हायड्रोजन वायू हा ऊर्जानिर्मितीच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरू शकेल. या हायड्रोजनवर मोटारगाडी चालविता येऊ शकेल. अशा तऱ्हेने ऊर्जाविषयक तंत्रविद्येत एक नवे युगच येऊ घातले आहे.

त्यांच्या संशोधनामुळे जीवरासायनिक, वैद्यकीय, कृषिविषयक तसेच औद्योगिक दृष्टचा महत्त्वाच्या असलेल्या व त्यांच्यावर दूरगामी परिणाम करणाऱ्या रसायनांची एक नवी पिढीच उदयास येऊ शकेल. उदाहरणार्थ, जीवांच्या बाबतीत क्रियाशील असलेले रेणू ओळखणारे यजमान रेणू कृत्रिम रीतीने तयार करणे हे उद्दिष्ट समोर ठेवून लेन यांनी मनुष्य-प्राण्यात मेंदू व मज्जासंस्थेतील अतिशय महत्त्वाच्या ॲसिटिलकोलीन या संदेशवाहक द्रव्याचा यजमान रेणू तयार केला आहे. तसेच पूर्णतया कृत्रिम एंझाइमे बनविण्याची शक्यता निर्माण झाली आहे. क्रॅम व लेन यांनी प्रोटिएज, एटीपीएज व ट्रान्ससायक्लेज या एंझाइमांची काही प्रमाणात नक्कल करणारे यजमान रेणू तयार केले आहेत. कृत्रिम एंझाइमे नैसर्गिक एंझाइमांपेक्षा अधिक स्थिर व विवेचक असल्याने ती पुष्कळ वैद्यकीय व औद्योगिक उपयोगांत अत्यंत मोलाची ठरतील. या संदर्भात क्रॅम यांचे सहकारी फ्रान्स्वा डायडेरिख म्हणतात : "( यामुळे ) कार्बनी उत्प्रेरकांच्या एका नव्या पिढीच्या शोधाच्या मार्गावरील आपली वाटचाल सुरू झाली आहे." कार्बनी संश्लेषणातही याचा वाढत्या प्रमाणात वापर होत आहे. उदाहरणार्थ, क्राऊन ईथरांचा एकाच ॲमिनो अम्लाचे प्रतिमासदृश्य प्रकार अलग करण्यासाठी उपयोग करता येतो.

लेन यांनी अलीकडेच कार्बनी आधारद्रव्य (सबस्ट्रेट) व धातूंचे आयन यांना बद्ध करणारी विशेष जटिल संयुगे बनविली आहेत. त्यामुळे विशेष-रेणू (सुपरमॉलेक्यूल ) बनविणे शक्य होईल. आधारद्रव्याची रचना व विक्रियेचा प्रकार यांमुळे येणाऱ्या मर्यादा अशा विशेष-रेणूंवर पडत नाहीत. म्हणून डायडेरिख म्हणतात की, यामुळे रसायने अलग करण्याचे काम अधिक अचूकतेने करता येऊ शकेल व याचेही महत्वपूर्ण संभाव्य उपयोग आहेत. तिघांच्या संशोधनामुळे संदूषित म्हणजे अपायकारक द्रव्ये मिसळल्या गेलेल्या मृदेतील किंवा पाण्यातील विषारी द्रव्ये काढून टाकण्यासाठी तसेच पर्यावरणातील लेशमात्र प्रमाणात असलेली रसायने पूर्वीपेक्षा अधिक अचूकतेने व अधिक संवेदनशीलतेने ओळखण्यासाठी लागणारी अत्यंत संवेदनशील रसायने निर्मिण्याची शक्यता निर्माण झाल्याचेही डायडेरिख यांना वाटते. यामुळे कर्करोगाविरुद्धची औषधे देण्याच्या पद्धतीत सुधारणा करणे शक्य झाले असून आयनोफोर या नव्या वर्गाच्या प्रतिजैव द्रव्यांची क्रिया कशी होते यावर नवा प्रकाश पडला आहे. या नोबेल पारितोषिकाचे एक आगळे वैशिष्टच म्हणजे या मूलभूत संशोधनामुळे निर्माण झालेल्या संभाव्य लाभांवर त्यात देण्यात आलेला भर, हे होय.

पेडरसेन यांचा जन्म पुसान ( कोरिया ) येथे ३ ऑक्टोबर १९०४ रोजी झाला. त्यांचे वडील नॉर्वेजियन व आई जपानी होती. त्यामुळे १९५३ पर्यंत ते नॉर्वेचे नागरिक होते व तदनंतर त्यांनी अमेरिकेचे नागरिकत्व

स्वीकारले. अमेरिकेतील डायटन विद्यापीठातून रासायनिक अभियांत्रिकीची पदवी तर मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीतून १९२७ साली पीएच्. डी. पदवी त्यांनी मिळविली. त्यांनी ई. आय. ड्यू पाँ नेमूर्स कंपनीत (विल्मिग्टन, डेलावर) १९२७–६९ या काळात संशोधक रसायनशास्त्रज्ञ म्हणून काम केले. येथील त्यांच्या संशोधनातून २५ संशोधनपर लेख व ६५ एकस्वे ( पेटंट ) निष्पन्न झाली. ते निगर्वी स्वभावाचे असून आपण करीत असलेल्या संशोधनाविषयी गेल्या वर्षी ते म्हणाले होते. "मी मजेखातर संशोधन करीत होतो. मला संशोधनात आनंद मिळतो. त्यामुळे सदासर्वदा उत्सुकता लागून राहाते व ते नेहमी नवे असते." पारितोषिकानंतर ते उद्‌गारले होते. "जी संधी इतरत्र मिळू शकली नसती, ती मला येथे मिळाली. या कंपनीने या कामासाठी मला नऊ वर्षे दिली हे लोकांना समजणे महत्त्वाचे आहे. इतरत्र असे संशोधन दडपले गेले असते ...... हे कार्य माझ्या कारकीर्दीतील सर्वांत महत्त्वाचे आहे."

क्रॅम यांचा जन्म चेस्टर (व्हर्‌माँट) येथे २२ एप्रिल १९१९ रोजी झाला. त्यांचे लग्न जेन मॅक्स्वेल यांच्याशी १९६९ साली झाले व त्या माउंट होलिओक महाविद्यालयात रसायनशास्त्राच्या प्राध्यापिका होत्या. क्रॅम यांनी रॉलिन्स महाविद्यालयातून बी. एस्. (१९४१) व नेब्रास्का विद्यापीठातून एम्. एस्. (१९४२) पदवी घेतल्यावर काही काळ मर्क अ‍ॅण्ड कंपनीत नोकरी केली. १९४५ साली ते हार्व्हर्ड विद्यापीठात दाखल झाले व १९४७ साली त्यांनी तेथून पीएच्. डी. पदवी संपादन केली. १९४८ साली ते कॅलिफोर्निया विद्यापीठात ( लॉस एंजल्स ) दाखल झाले व १९५६ पासून तेथे प्राध्यापक म्हणून आहेत. त्यांना अनेक मान्यवर संस्थांचे सदस्यत्व व फेलाशिप, विविध विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या, अनेक पुरस्कार, पारितोषिके वगैरे सन्मान मिळाले आहेत. 'आर्‌गॅनिक केमेस्ट्री' ( १९५९ ), 'रिॲक्शन मेकॅनिझम' ( १९६२ ), 'फंडामेंटल्स ऑफ कार्बनियन केमिस्ट्री' ( १९६५ ), 'एलेमेंट्स ऑफ आर्‌गॅनिक केमिस्ट्री' ( १९६७ ), 'इसेन्स ऑफ आर्‌गॅनिक केमिस्ट्री' (१९७८) इत्यादी पुस्तकांचे ते सहलेखक असून त्यांनी ३४० पेक्षा जास्त शोध-निबंध लिहिले आहेत. त्यांना टेनिस, लाटांवर आरूढ होणे व बर्फावरून घसरत जाणे या खेळांची आवड असून गिटार वाजविण्याचा छंदही त्यांना आहे.

क्रॅम यांच्या संशोधनाचा प्रभाव जगभर जाणवतो. कारण त्यांच्या मार्गदर्शनाखाली सुमारे ५० जणांनी पीएच्. डी. पदवी संपादन केली असून त्या विद्यार्थ्यांनी क्रॅम यांच्या कल्पना आंतरराष्ट्रीय रासायनिक क्षेत्रात फैलावल्या आहेत. तसेच नेदर्लंड्स किंवा जपानसारख्या देशांत रेणवीय ओळखीविषयीचे संशोधन करीत असलेल्या बहुतेक संशोधकांनी क्रॅम यांच्या प्रयोगशाळेत थोडा काळ व्यतीत केलेला आहे.

लेन यांचा जन्म फ्रान्समधील रोशेइम येथे ३० सप्टेंबर १९३९ रोजी झाला व १९६५ साली त्यांनी सिल्व्ही डेडरर यांच्याशी विवाह केला. त्यांचे शिक्षण स्ट्रासबुर्ग विद्यापीठात झाले व तेथे विविध पदांवर त्यांनी काम केले. १९६३ साली त्यानी तेथून विज्ञानातील डॉक्टरेट पदवी संपादन केली. तेथील ल्वी पाश्चर विद्यापीठात १९७० पासून व पॅरिस येथील कॉलेज द फ्रान्समध्ये १९७९ पासून ते रसायनशास्त्राचे प्राध्यापक आहेत. त्यांना अनेक संस्था-संघटनाचे सदस्यत्व, पदके व पारितोषिके वगैरे सन्मान मिळाले आहेत. त्यांनी २५० हून जास्त शोध-निबंध लिहिले आहेत. त्यांना संगीताची आवड आहे. लेन आपल्या संशोधनाविषयी म्हणतात : 'रेणू एकमेकांना कसे ओळखू शकतात हे जाणून घेणे हा आमच्या संशोधनाचा हेतू आहे." लेन यांच्या सहकाऱ्यांच्या मते लेन यांच्या अंगी नेतृत्वाचे गुण असून त्यांच्या कल्पना इतक्या छाप पाडणाऱ्या असतात की, त्यांच्याजवळ निष्ठावंत अनुयायांचा तांडाच जमा होतो. लेन हे फ्रान्समधील एक अग्रगण्य रसायनशास्त्रज्ञ असून ते अतिशय तरुण तसेच पेचात टाकणारे प्रश्न उपस्थित करणारे शास्त्रज्ञ आहेत, असे कोलंबिया विद्यापीठातील एका रसायनशास्त्रज्ञांचे मत आहे; तर फ्रान्समधील संशोधकांना लेन यांचे हे पारितोषिकप्राप्त संशोधन हे त्यांच्या अनेक असामान्य संशोधनांतील एक संशोधन आहे, असे वाटते.

वरील तिघांनी कधीही एकत्र काम केलेले नाही व क्रॅम याचे वर्णन "सहकारी-स्पर्धक" असे करतात. त्यांचे सहकारी एम्. हार्व्ही लुबे यांच्या मते या तिघांचे संशोधन एखाद्या मध्यवर्ती कल्पनेतून पुढे आलेले नाही; तर ते संशोधनाचे वेगवेगळे अनेक मार्ग एकत्रित आल्याचा परिणाम आहे. गेस्ट-होस्ट रसायनशास्त्र हे

स्वतःची पद्धती व उद्दिष्टे असणारे खास ज्ञानक्षेत्र असल्याचे या पारितोषिकामुळे सूचित झाले आहे.

निसर्गात एकत्रितपणे कार्य करणाऱ्या रेणूंचे आकार कुलूप-किल्लीप्रमाणे परस्परपूरक असतात. म्हणजे एखादी अपेक्षित विक्रिया सुरू करावयाची असल्यास योग्य ती चपखल किल्लीच वापरावी लागते. थोडक्यात सांगायचे झाल्यास या तिघांनी अशा रेणवीय चाव्या कृत्रिम रीतीने तयार करण्यात यश मिळविले आहे. यामुळे निसर्गाचा गुंता समजून घेण्याच्या माणसाच्या दीर्घ वाटचालीत एक पाऊल पुढे पडले आहे, असे म्हणता येईल.

## शरीरक्रियाविज्ञान

शरीराच्या रोगप्रतिकारक्षमतेचे नियमन करणाऱ्या थोड्याच जनुकांकडून ( जीनकडून ) भिन्न प्रकारची असंख्य प्रतिपिंडे ( अँटिबॉडी ) कशी निर्माण केली जातात, हे स्पष्ट केल्याबद्दल सुसुमू तोनेगावा ( ४८ ) या जपानी जीववैज्ञानिकांना या वर्षीचे वैद्यकाचे किंवा शरीरक्रियाविज्ञानाचे पारितोषिक देण्यात आले आहे. नोबेल पारितोषिक मिळविणारे ते सातवे जपानी संशोधक आहेत, तर जपानी वैज्ञानिकाला या विषयाचे नोबेल पारितोषिक प्रथमच लाभत आहे आणि १९८३ चा बार्बारा मॅक्लिटक यांचा अपवाद सोडता १९६१ सालानंतर या विषयाचे पारितोषिक विभागले न जाण्याची ही दुसरीच वेळ आहे. या वर्षीचा अल्बर्ट लास्कर वैद्यकीय संशोधन पुरस्कार सप्टेंबरात (१९८७) जाहीर झाला व ज्या चार जणांना तो मिळाला, त्यांपैकी तोनेगावा एक होते. यामुळे या विषयाच्या नोबेल परितोषिकाचे ते एक स्पर्धक आहेत असे तेव्हापासूनच वाटू लागले होते आणि १२ ऑक्टोबर १९८७ रोजी हा अंदाज खरा ठरला.

गेल्या १५ वर्षांत हे पारितोषिक रोगप्रतिकारक्षमतेविषयीच्या संशोधनाला मिळण्याची ही पाचवी वेळ आहे. यापूर्वी १९७२, १९७६, १९८२ व १९८६ साली ते अशा संशोधनाला मिळाले होते. यावरून या क्षेत्रातील संशोधनाचा झपाटा लक्षात येईल. शरीराची अंगभूत संरक्षणव्यवस्था अधिक चांगल्या प्रकारे जाणून घेणे व आयुष्यभरासाठी रोगमुक्त करणाऱ्या प्रभावी व सुरक्षित लसी बनविण्याची गरज यांच्या पोटी या संशोधनाला प्रोत्साहन मिळत आले आहे आणि हे पारितोषिक म्हणजे या प्रयत्नांना मिळालेली पावतीच होय.



माणसाच्या शरीरावर सूक्ष्मजीव, विषाणू, कवके वगैरेंचा हल्ला होत असतो; विषासारखे अपायकारक वा प्रथिने, अवयव इत्यादींसारखे अनोळखी, परके पदार्थ शरीरात चुकून जातात वा समाविष्ट करावे लागतात. असे आक्रमक वा अपरिचित पदार्थ शरीर ओळखू शकते. म्हणजे आपला वा परका असा भेद शरीर करू शकते आणि आक्रमक ओळखण्याच्या या तत्त्वाच्या आधारे शरीर त्याविरुद्ध प्रतिहल्ला चढवू शकते व यातून शरीराची नैसर्गिक रोगप्रतिकारक्षमता निर्माण होत असते. एंझाइमांसारखी प्रथिने, विषे व विशेषतः उच्च रेणुभाराच्या अनोळखी द्रव्यांना प्रतिजन ( अँटिजेन ) म्हणतात. आणि या प्रतिजनावर प्रतिहल्ला करण्याच्या प्रतिसादातून जे प्रथिन शरीरात उत्पन्न होते त्याला प्रतिपिंड म्हणतात. अशा प्रकारे शरीर रोगकारकाविरुद्धचा वा परक्या द्रव्याविरुद्धचा प्रतिसाद म्हणून प्रतिपिंडे निर्माण करून आपले रक्षण करून घेत असते. रक्तातील पांढऱ्या पेशींचा एक प्रकार म्हणजे बी-लसीकापेशी (बी-लिंफोसाइट) होत. त्या बोनमॅरोमध्ये म्हणजे अस्थिमज्जेत पक्व होतात म्हणून त्यांना बी-लसीकापेशी म्हणतात. या पेशींमार्फत प्रतिपिंडांची निर्मिती होत असून या निर्मितीवर पेशींतील जनुकांत असलेल्या आनुवंशिक माहितीच्या साठ्याचे नियंत्रण असते. प्रतिपिंड त्याच्या प्रतिजनाच्या बाबतीत इतके रामबाण गुणकारी ठरण्याचे कारण म्हणजे त्याचा एक वैशिष्टयपूर्ण गुणधर्म होय. रोगकारक सूक्ष्मजीवाच्या ( वा प्रतिजनाच्या ) रेणवीय रचनेला तंतोतंत अनुरूप ठरेल अशा तऱ्हेनेच प्रतिपिंडाची रचना निर्माण केली गेलेली असते. अशा प्रकारे प्रतिजन व त्याच्याशी निगडित असलेले प्रतिपिंड यांच्यातील समरूपता इतकी वैशिष्टयपूर्ण असते की, तिला कुलूप व त्यात चपखलपणे बसणारी त्याची किल्ली यांची उपमा देण्यात येते. यामुळेच एका रोगकारक सूक्ष्मजीवाविरुद्धच्या प्रतिपिंडाचा दुसऱ्या सूक्ष्मजीवावर परिणाम होत नाही. अशा तऱ्हेने शरीराला आक्रमक व परकीय अशा अगणित द्रव्यांविरुद्धची अनंत प्रतिपिंडे निर्माण करावी लागतात. तसेच बहुतेक प्रथिनांविरुद्धची प्रतिपिंडेही शरीरात निर्माण होत असतात.

प्रतिपिंडांद्वारे संसर्गकारकाचे निवारण होते हे फोन बेरिंग यांनी दाखवून दिले होते (आणि त्यासाठी त्यांना वैद्यकाचे पहिले नोबेल पारितोषिक १९०१ साली मिळाले होते). आणि तेव्हापासून अशी अनंत प्रतिपिंडे निर्माण करण्याची व्यवस्था शरीराकडून कशी केली जाते, हा प्रश्न वैज्ञानिकांना सतावत आला आहे. शरीरातील आनुवंशिक माहितीच्या साठ्यात एखाद्या द्रव्याची आवश्यक ती नीलप्रत (तपशीलवार आराखडा) असल्याशिवाय एखादी पेशी ते द्रव्य निर्माण करू शकत नाही, असे (सध्या) गृहीत धरण्यात येते. तथापि ज्या अर्थी शरीर इतकी असंख्य प्रतिपिंडे निर्माण करते. त्या अर्थी शरीरात पुरेशी आनुवंशिक वा जननिक माहिती असली पाहिजे असा निष्कर्ष निघतो. मात्र शरीरात बी-लसीकापेशी मोजक्याच असल्याने त्यांच्याकडून इतकी अगणित प्रतिपिंडे कशी निर्माण केली जातात, हे कळत नव्हते आणि त्यामुळेच वरील प्रश्नाचे उत्तर मिळत नव्हते. या कोड्याचे स्पष्टीकरण तोनेगावा यांनी पुढीलप्रमाणे दिले : वरवर पाहता मर्यादित बी-लसीकापेशींमार्फत अनंत प्रतिपिंडे निर्माण होऊ शकत असली, तरी या प्रतिपिंडांशी संबंधित अशी अनंत जनुके या पेशींत नसतात. उलट त्यांच्यामध्ये प्रतिपिंड-निर्मितीचे नियमन करणारी जनुके सापेक्षतः थोडीच असतात. मात्र या जनुकांचे खंड परत परत पिसले जाऊन पुनःसंयोगित होऊन एकमेवाद्वितीय वैशिष्ट्याची असंख्य प्रतिपिंडे निर्माण होऊ शकतात. बी-लसीकापेशींजवळ अशी संयोगक्षमता असल्याचेही त्यांनी दाखवून दिले. यासाठी अत्याधुनिक तंत्रे वापरून त्यांनी पक्व पेशी व भ्रूणातील तिची पूर्वगामी पेशी यांची तुलना केली व त्यांच्यातील जनुकांची मांडणी भिन्न प्रकारे झालेली असते, असेही दाखवून दिले.

तोनेगावा हे सध्या मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीत (एम आय टी) जीवविज्ञानाचे प्राध्यापक आहेत. मात्र त्यांचे वरील पारितोषिकपात्र संशोधन त्यांनी स्वित्झर्लंडमधील बाझेल रोगप्रतिकारक्षमता-विज्ञान संस्थेत नोबोमुची होझुमी यांच्याबरोबर केले होते. या संशोधनाला १९७४ च्या सुमारास सुरुवात झाली व त्यांनी आपले निष्कर्ष 'प्रोसिडिंग्ज ऑफ नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस' मध्ये १९७६ साली लेखमाला लिहून प्रसिद्ध केले. १९८१ साली एमआयटीमध्ये दाखल झाल्यावरही त्यांनी आपले हे संशोधन पुढे चालू ठेवले. अशा प्रकारे त्यांनी यूरोप-अमेरिकेत त्यांनी २० वर्षे संशोधन केले आहे. आपल्या वरील संशोधनाविषयी ते म्हणतात : "कोणत्याही व्यक्तीमधील जनुकाचा अनुक्रम (मांडणी) न बदलणारा असतो, असे गृहीत तत्त्व होते. म्हणजे एक जनुक एकच प्रतिपिंड निर्माण करते एवढेच तेव्हा माहीत होते. जनुक स्वतःच्या अंगभूत घटकांत उलटापालट करून त्यांची फेरमांडणी करते व अशा तऱ्हेने लाखो प्रतिपिंडे निर्माण करणे शक्य होते, हे वरील संशोधनाद्वारे दाखवून दिले आहे." म्हणून नोबेल समितीचे एक सदस्य एर्लिंग नॉर्बी म्हणाले : "शरीरातील एक लाख जनुके भिन्न व अपरिचित रोगकारकांविरुद्धची एक अब्ज प्रतिपिंडे एकाएकी कशी निर्माण करू शकतात, हे दीर्घकाळापासून सतावणारे कोडे त्यांनी उलगडले आहे." तर नोबेल समिती आपल्या घोषणेत म्हणते : "हल्ला करणाऱ्या रोगकारकांना रोगप्रतिकारक्षम पेशी कशा ओळखतात व त्यांच्यावर प्रतिहल्ला करण्यासाठी आपल्या आनुवंशिक सामग्रीत कसे बदल करतात, हे तोनेगावा यांनी दाखविले आहे.

पारितोषिक मिळाल्याचे समजल्यावर ते म्हणाले होते : "माझ्या संशोधनामुळे कर्करोग, एड्स यांसह अनेक रोगांविषयी अधिक माहिती मिळून त्यांच्यावर काबू मिळविण्यासाठी मदत होईल. सुरळीतपणे चाललेली असते तेव्हा रोगप्रतिकार-संस्थेचे कार्य कसे चालते हे जर आपल्याला कळले, तर तिच्यात दोष का निर्माण होतात हेही आपण जाणू शकू. माणसाला एवढे रोग का होतात हेही लक्षात येईल." नोबेल समितीच्या मते हे संशोधन वैद्यकामध्ये नेहमीसाठीही उपयुक्त ठरू शकेल. उदाहरणार्थ, लसीचा प्रभाव सुधारणे, प्रतिरोपण शस्त्रक्रिया, रोगनियंत्रणाविषयी अधिक चांगले उपाय शोधणे वगैरे.

तोनेगावा यांचा जन्म नागोया (जपान) येथे ५ सप्टेंबर १९३९ रोजी झाला. क्योटो विद्यापीठाची बी. एस्. पदवी १९६३ साली संपादन केल्यावर ते कॅलिफोर्निया विद्यापीठात (सान दिएगो) गेले व तेथून १९६८ साली त्यांनी पीएच्. डी. पदवी संपादन केली. मात्र अमेरिकेत राहाण्याच्या परवान्याची मुदत संपल्याने १९७१ साली त्यांना अमेरिका सोडावी लागली व ते बाझेलला गेले. तोनेगावा हे काहीसे

अनुक्रमणिका

एकांतप्रिय गृहस्थ असून ते नेहमी कामात दंग असतात. ते कोणाला विशेष भेटत नाहीत. कुशल प्रयोगकर्ते असल्याने ते बहुधा प्रयोगशाळेत दिसतात. मात्र याचा अर्थ ते विनयशील नाहीत असा नाही. आपण एकटेच या पारितोषिकांचे मानकरी आहोत हे समजल्यावर त्यांना आश्चर्य वाटले होते व हे पारितोषिकही आपल्याला लेरॉय हूड व फिलिप लेडर या आपल्या लास्कर पुरस्कार सहविजेत्यांबरोबर संयुक्तपणे मिळायला हवे होते, असे मनोगत त्यांनी व्यक्त केले होते. तथापि या वर्षी नोबेल समितीने मूलभूत संशोधनालाच हे पारितोषिक देण्याचे ठरविलेले दिसते. म्हणजे या शोधात अधिक भर टाकणाऱ्या वा त्याचा तंत्रवैज्ञानिक उपयोग करून घेणाऱ्या संशोधकांचा पारितोषिकासाठी विचार समितीने केलेला दिसत नाही. कारण भौतिकीच्या पारितोषिकाच्या बाबतीतील निर्णयही अशाच प्रकारचा आहे.

१९८६ सालीच एका परिषदेत त्यांना जपानी वार्ताहरांनी छेडले होते की, जपानी जीववैज्ञानिकाला शरीरक्रियाविज्ञानाचे नोबेल पारितोषिक का मिळत नाही व ते स्वतः हा पायंडा मोडणार आहेत का ? या वर्षी जरी या खोचक प्रश्नांची उत्तरे मिळाली असली, तरी तेव्हा त्यांनी या अपयशाचा ठपका जपानमधील संशोधनपद्धतीवर ठेवला होता. आपण जपानबाहेर पडलो नसतो तर हे यश आपल्याला मिळाले नसते असे त्यांना वाटते कारण बाझेलमध्ये आपल्या संशोधनाचा पाठपुरावा करण्यासाठी आवश्यक पैसा व प्रोत्साहनही मिळाल्याचा ते आवर्जून उल्लेख करतात ( भारताच्या संदर्भातही हे खरे आहे ). म्हणून ते जपानी संशोधकांनी बाहेर पडून संशोधनाचा पाठपूरावा करावा, असे सुचवितात.

## शांतता

या वर्षीचे शांततेचे नोबेल पारितोषिक दक्षिण अमेरिकेतील कोस्टारिका या देशाचे अध्यक्ष ऑस्कर आरियास-सांचेझ यांना मध्य अमेरिकेतील संघर्ष संपुष्टात आणण्यासाठी शांतता-योजना मांडल्याबद्दल देण्यात आले आहे. कार्लोस साव्हेद्रा लामास (१९३६), आदाल्फो पेरेय एईव्हेव्हेल ( १९८० ) व आल्फान्सो गार्सिया रॉबल्स ( १९८२ ) यांच्या नंतर हे पारितोषिक मिळविणारे ते चौथे दक्षिण अमेरिकन गृहस्थ आहेत. कोस्टा रिका या चिमुकल्या देशाची लोकसंख्या सध्या २५ लाख असून हा देश 'लोकशाहीचा स्वर्ग' म्हणून संबोधला जातो. कारण १५ सप्टेंबर १८२१ रोजी स्वतंत्र झालेल्या या देशात तेव्हापासून लोकशाही शासन टिकून आहे ( दरम्यान दोनदा अल्पकाळ लोकशाही शासन नव्हते हा याला अपवाद आहे ). १८२४ ला एक शिक्षक या देशाचे पहिले अध्यक्ष झाले. आरियास हे ४७ वे अध्यक्ष आहेत. अध्यक्षपदाचीच नव्हे तर पोलिसांची मुदतही चार वर्षे ठरविण्यात आलेली आहे. १९४९ साली देशातील सैन्य जाणून-बूजून बरखास्त करण्यात आले आहे सैन्य नसल्याने हा देश शिक्षण व सांस्कृतिक कामांवर २५ टक्के खर्च करू शकतो. अध्यक्षपदी कोणाही व्यक्तीला एकदाच काम करता येते आणि येथे सत्ता ही तात्पुरती राष्ट्रीय सेवा मानली जाते.

आरियास यांचा जन्म सान जोसजवळील हेराडिया येथे १३ सप्टेंबर १९४१ रोजी तेथील एका सर्वात श्रीमंत कॉफी-मळेवाल्या कुटुंबात झाला त्यांचे आजोबा दोन अध्यक्षांच्या मंत्रीमंडळात मंत्री होते; तर वडील त्या देशाच्या मध्यवर्ती बँकेचे अध्यक्ष होते. आरियास यांनी आधीचे शिक्षण देशातच घेतल्यावर वैद्यकीय शिक्षणासाठी ते अमेरिकेतील बोस्टन विद्यापीठात गेले. त्या काळात इतर लॅटिन अमेरिकन नेत्यांप्रमाणे त्यांच्यावरही जॉन एफ् केनेडी यांच्या विचारांची छाप पडली. वैद्यकाविषयीची गोडी कमी झाल्यावर ते मायदेशी परतले व त्यांनी सान जोस येथील कोस्टारिका विद्यापीठात कायदा व अर्थशास्त्र यांचे अध्ययन सुरू केले. याच वेळेस ते नॅशनल लिबरेशन पार्टी या पक्षात दाखल होऊन सक्रिय राजकारणात उतरले. काही काळ त्यांनी लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्येही अध्ययन केले. १९६९ साली मायदेशी परतल्यावर त्यांनी 'हू रूल्स इन कोस्टा रिका ?' हा प्रबंध लिहून इसेक्स विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी संपादन केली. काही काळ त्यांनी कोस्टारिका विद्यापीठात अध्यापनाचे काम केले असून १९७२-७७ या काळात ते नियोजनमंत्री होते व १९७९ साली ते वरील पक्षाचे महासचिव झाले. १९७३ साली त्यांचा विवाह मार्गारिटा यांच्याशी झाला असून त्यांना दोन मुले आहेत. त्यांना इंग्रजी चांगले येत असले तरी स्पॅनिशमध्ये बोलायला अधिक आवडते.

आरियास महत्त्वाकांक्षी असून स्वतःचा बडेजाव मिरविण्याचे कसब त्यांच्या अंगी आहे. त्यांनी शाळेच्या नियतकालिकात लेख लिहिला तेव्हाच अध्यक्ष बनण्याची आपली इच्छा व्यक्त केली होती. तर एकदा ते गमतीने म्हणाले होते की, अध्यक्ष होण्याची कल्पना आपल्याला आईच्या पोटात असतानाच प्रथम सुचली होती. नोबेल पारितोषिकाची घोषणा होण्यापूर्वी तीन महिने आधी त्यांना संयुक्त राष्ट्रांचे महासचिवपद व नोबेल पारितोषिक मिळविण्याची कशी उत्सुकता लागून राहिली आहे, याविषयीचे विनोद लोक एकमेकांना ऐकवीत असत. यापैकी त्यांची एक इच्छा इतक्या लवकर पुरी झाली खरी. मे १९८६ मध्ये ५२ टक्के मते मिळवून देशाचे अध्यक्ष म्हणून ते निवडून आले व लगेचच त्यांनी या योजनेचे काम सुरू केले. अध्यक्षपदी निवडून आल्यावर त्यांनी केलेल्या भाषणात पुढील विचार मांडले होते : "आपल्याला बंदूक व भाकरी यांतून एकीची निवड करायची होती व जनतेने भाकरीची निवड केली आहे. ...मध्य अमेरिकेतील शस्त्रसंघर्षातून आम्ही कोस्टा रिकाला दूर ठेवू आणि मुत्सद्देगिरी व राजनैतिक मार्गांनी मध्य अमेरिकन बांधवांचा परस्परांकडून होणारा संहार रोखण्याचा प्रयत्न करू." (गेल्या ३० वर्षांत या संघर्षात २ लाख लोक मृत्युमुखी पडले आहेत.) ते स्वतंत्रपणे विचार करणारे व स्पष्ट बोलणारे आहेत. त्यामुळे ते काँट्रा बंडखोरांना होणारी अमेरिकेची मदत व मानागुआतील सँडिनिस्टा राजवटीची अतिरेकी कृत्ये या दोन्हीवर घणाघाती टीका करतात. तसेच त्यांनी अध्यक्ष डॅनिएल ओर्टेगा यांना सुनावले होते : "तुमच्यात व आमच्यात एक फरक आहे. तो म्हणजे आम्ही विरोधी पक्षाचे नेते व्हायला तयार आहोत, पण तुम्ही तसे तयार नसता. राजकीय सत्तेसाठी जोखीम घ्यायला तुम्ही तयार नसता."

आरियास यांनी ग्वातेमाला, एल साल्वादोर, होंडुरास व निकाराग्वा या देशांच्या अध्यक्षांची बैठक तथाकथित काँटाडोरा गटाने पुढे मांडलेल्या सूचनांवर एकत्रितपणे चर्चा करण्यासाठी बोलावली होती. या बाबतीत संपूर्णतया एकमत होऊ शकले नाही. त्यामुळे आरियास यांनी आपल्या काही सूचनांचा समावेश करून एक नवीन सुधारित शांतता-योजना १९८७ च्या प्रारंभी मांडली. आणि ७ ऑगस्ट १९८७ रोजी वरील पाच अध्यक्षांनी या योजनेच्या मसुद्यावर ग्वातेमाला सिटीत सह्या केल्या. कोठलेही सैन्य सामील नसलेल्या या शांतता योजनेतील महत्त्वाचे मुद्दे असे आहेत : यादवी युद्ध थांबविणे, शांतता प्रस्थापित करणे, निर्वासितांना स्वदेशी परत पाठविणे, बंडखोरांना मिळणारी परकीय मदत थांबविणे, एखाद्या देशावर हल्ला करण्यासाठी अन्य देशाचा प्रदेश न वापरणे आणि अधिक लोकशाहीकरण करण्यास चालना देणे. ही योजना ७ नोव्हेंबर १९८७ पर्यंत अमलात आणायचेही ठरले होते. पण त्यात अनेक अडचणी आहेत, हेही लक्षात घेण्यात आले होते. निकाराग्वातील काँट्रा बंडखोरांना असलेला अमेरिकेचा पाठिंबा ही प्रमुख अडचण होती. म्हणून आपली योजना अमेरिकन जनतेपुढे मांडण्यासाठी त्यांनी अमेरिकेत जाऊन तिचा न्यूयॉर्क, बोस्टन व वॉशिंग्टन येथे पाठपुरावा केला होता. अमेरिकेने निकाराग्वातील बंडखोरांना पाठिंबा देण्याचे थांबवावे व अध्यक्ष ओर्टेगांच्या सत्तेला अधिकृत मान्यता द्यावी असे या योजनेत आवाहन केले असले, तरी अमेरिकेतील संसदसदस्यांपुढे ती मांडायला गेले असता त्यांचे उत्स्फूर्त स्वागत झाले. तेव्हा ते म्हणाले होते "आपण परस्परसामंजस्यावर श्रद्धा ठेवू या व शांतताप्रयत्नांना एक संधी देऊया." या योजनेमुळे ओर्टेगा व दुआर्ते (एल साल्वादोरचे अध्यक्ष) हे शत्रुपक्ष एकत्र आणण्यात आरियास यांना यश आले होते; तसेच काही काँट्रा बंडखोरांनीही या प्रयत्नांची भलावण केली आहे. शिवाय या योजनेबरहुकूम सर्व संबंधितांनी ७ नोव्हेंबर १९८७ पर्यंत करावयाची असलेली पुष्कळ कामेही करण्यात आलेली आहेत उदाहरणार्थ, निकाराग्वातून हाकलून दिलेल्या तीन धर्मगुरूंना परत बोलाविण्यात आले, १६ परदेशी बंदिजनांना माफी देण्यात आली, विरोधकांचे एक दैनिक परत सुरू झाले, रेडिओ प्रसरणावरील बंदी उठविण्यात आली, दूरवरच्या चार भागांत युद्धबंदी जाहीर करण्यात आली. असे असूनही या योजनेच्या मार्गातील अडथळे संपलेले नाहीत. काँट्रा बंडखोरांशी आमने-सामने चर्चा करायला मानागुआची तयारी नाही व या बंडखोरांना होंडुरासचा तळ वापरणे अवघड होणार आहे. मात्र दुआर्ते हे या बंडखोरांना अमेरिकेकडून होणारी मदत ही अमेरिकेची अंतर्गत राजकीय बाब असल्याचे मानतात.

या वर्षी या पारितोषिकासाठी संस्था व व्यक्ती मिळून ९३ स्पर्धक होते. त्यांमध्ये फिलिपीन्सच्या अध्यक्षा कोरॅझोन ॲक्विनो, अर्जेंटिनाचे अध्यक्ष राउल

अल्फॉन्सिन, नेल्सन व विनी मंडेला, ब्रियात उर्खात, जागतिक आरोग्य संघटना वगैरेंची नावे जास्त चर्चिली जात होती. घोषणेपूर्वीच्या आठवडयापर्यंत आरियास यांच्या नावाविषयी अफवासुद्धा नव्हती. त्यामुळे या घोषणेचे सर्वांनाच आश्चर्य वाटले. त्यांचे नाव एका स्विडिश संसदसदस्याने सुचविले होते. पारितोषिका-साठी निवडीचे काम गेल्या वर्षीएवढेच अवघड होते असे नॉर्वेतील नोबेल समितीचे अध्यक्ष एगिल आर्व्हिक यांना वाटते. ही योजना नावे सुचविण्याच्या अंतिम तारखेपर्यंत म्हणजे १५ फेब्रुवारी १९८७ पर्यंत मांडली नव्हती व संबंधित अध्यक्षांनी ऑगस्टपर्यंत ती स्वीकारलीही नव्हती याविषयी स्पष्टीकरण देताना आर्व्हिक म्हणाले : " आम्ही समितीतील मंडळी हवेत भराऱ्या मारीत नसतो ...निश्चितपणे कार्य करणाऱ्या कोणा व्यक्तीला हे पारितोषिक देता आले हे महत्त्वाचे आहे. कारण त्यामुळेच या परितोषिकाचा काही प्रभाव पडू शकेल." शांतता पदकावर उद्धृत केलेला हेतू असा आहे : 'शांततेसाठी व राष्ट्राराष्ट्रांमधील बंधुभावा-साठी.' मात्र पूर्वीही या पारितोषिकाविषयी मतभेद झाले असून त्याच्या प्रभावाविषयी रास्तपणे शंका व्यक्त करण्यात आल्या होत्या. उदाहरणार्थ, १९७३ साली हेन्री किसिंजर व ली डक थो यांना 'व्हिएतनाममधील युद्धसमाप्तीसाठी बोलणी केल्याबद्दल' हे पारितोषिक देण्यात आले होते. मात्र तेव्हा या दोघांनी केवळ जाहीर केलेली युद्धबंदी ठिसूळ ठरली होती. कारण त्याच वेळी लाओस व कांपुचियात नव्याने युद्ध पेटले व १९७५ पर्यंत व्हिएतनाम युद्ध चालूच होणे. एवढेच नव्हे तर तेव्हाच्या नोबेल समितीतील पाचपैकी दोघा सदस्यांनी राजीनामा दिल्याने खुद्द सपितीतील बंधु-भावालाही तडा गेला होता. १९७८ साली अन्वर सादात व मेनाचिम बेजीन यांना कँप डेव्हिड कराराच्या प्रारंभिक आराखडयावर सप्टेंबर ७८ मध्ये सह्या केल्याबद्दल हे पारितोषिक दिले होते. मार्च १९७९ मध्ये त्यांनी पूर्णस्वरूपी करारावर सह्या केल्या होत्या, तरी ईजिप्त व इझ्राएल यांच्यात निकटचे संबंध प्रस्था-पित झाले नाहीत. पारितोषिकाची घोषणा होण्याच्या थोडेच दिवस आधी इझ्राएलने गाझापट्टीच्या पश्चिम भागातील ज्यू लोकांच्या वसाहती वाढविण्याची योजना जाहीर केली व त्यामुळे सादत यांनी पारि-तोषिक वितरण समारंभास जाण्याचे नाकारले होते. १९५७ साली हे पारितोषिक कॅनडाचे परराष्ट्रमंत्री लेस्टर पिअरसन यांना 'सुएझ कालवा संघर्ष सोडविल्या बद्दल' देण्यात आले होते. मात्र हाच संघर्ष तदनंतर दहा वर्षांनी 'सहा दिवसांचे युद्ध' या नव्या नावाने पुनश्च उद्भवला होता.

पारितोषिकाविषयीची बातमी आली तेव्हा आरियास पत्नी-मुलांसह पॅसिफिक किनाऱ्यावरील एका दूरच्या ठिकाणी सुटी घालविण्यासाठी गेले होते. तेथे दूरध्वनी, दूरचित्रवाणी वगैरे सोयी नाहीत. त्यामुळे बाह्य जगाचा संपर्क टळेल असे त्यांना वाटले असावे. मात्र शेवटी या एकांतवासात व्यत्यय आलाच. गुंतागुंतीच्या रेडिओसंपर्काची जोडणी करून त्यांच्या धाकटचा भावाने राजधानी सान जोस येथून त्यांच्याशी संपर्क साधला. तेव्हा हा भाऊ रॉड्रिगो उत्साहाने ओर-डला : "त्यांनी तुला शांततेचे नोबेल पारितोषिक दिले आहे." तेव्हा आरियास म्हणाले : " नाही, नाही. माझा यावर विश्वास बसत नाही. यासाठी माझ्या नावाचा विचार करण्यात येत आहे, असे कदाचित ते म्हणाले असतील." यावर पुनश्च रॉड्रिगोने खात्री करून दिली : " ऑस्कर, तुला त्यांनी ते पारितोषिक दिले आहे हे नक्की !"

यानंतर मात्र ते तातडीने सान जोसला परत आले. तोपर्यंत त्यांच्या निवासस्थानाकडे लोकांची रीघ लागली होती. शाळांनी सुट्टी घेतली, तर विद्यापीठातील विद्या-र्थ्यांनी भव्य मिरवणूक काढली. नंतर एक विराट सभा झाली व जंगी वार्ताहर परिषदही झाली. तेव्हा ते म्हणाले : " हा माझ्या आयुष्यातील सर्वांत आनंदाचा दिवस आहे. मला आश्चर्याचा सुखद धक्का बसला असून माझ्या मध्य अमेरिकेविषयीच्या योजनेला शुभा-शीर्वाद लाभला आहे... हे पारितोषिक नैतिक दृष्टचा सर्व पाचही अध्यक्षांचे आहे. आपण दुप्पट जोमाने प्रयत्न करू या. निराशा बाजूला सारू या व जगाला धोका न देण्याचा निर्धार करू या. आपणा पाचजणांकडे जगाचे पूर्वी कधीही नव्हते एवढे लक्ष लागून राहिले आहे. आता आपली जबाबदारी वाढली आहे. शांतता प्रस्थापिण्याच्या कामी शिथिलता येऊ देता कामा नये... पारितोषिक आपल्याला साहाय्य व प्रेरणा देईल. त्यामुळे आपण आपल्या प्रयत्नांत कमी पडता कामा नये ... युद्धबंदीमुळे सुरू झालेली प्रक्रिया थांबू देता कामा नये. युद्धबंदीचा मी अधिक आग्रह धरीन कारण मध्य अमेरिकेत टिकाव

शांतता येण्यासाठी ती आवश्यक आहे.. हे पारितोषिक म्हणजे अंतिम ध्येय गाठल्याची नव्हे तर निम्मा रस्ता पार केल्याची पावती आहे. तडजोडीविना शांतता येणार नाही. यामुळे मध्य अमेरिकेत आता नवीन वातावरण निर्माण झाले आहे. अध्यक्ष ओर्टेगा आपली मते परत तपासून पाहतील व सुसंवादाचा स्वीकार करतील, अशी मला आशा आहे."

ओर्टेगा त्यांचे अभिनंदन करताना म्हणाले : "तुमचा पुढाकार व प्रयत्न यांच्यामुळे आपण शांततेच्या अधिक जवळ आलो आहोत." तर दुआर्ते म्हणाले : "त्यांना शांतता आपल्या स्वतःसाठी नको होती, येथील युद्धात बळी पडलेल्या सर्वांचा विचार ते करीत होते." या पारितोषिकापोटी मिळणाऱ्या पैशाचा विनियोग कोस्टा रिकातील कमनशिबी लोकांना मदत करण्यासाठी उभारावयाच्या निधीसाठी आपण करणार असल्याचे आरियास यांनी लगेचच जाहीर केले.

आरियास यांच्या कार्याचे महत्त्व निशद करताना नोबेल समितीने केलेले पुढील निवेदन लक्षणीय आहे : ग्वातेमाला योजनेचे शिल्पकार म्हणून "आरियास यांनी संघर्ष व यादवी युद्ध यांनी दीर्घकाळापासून उद्ध्वस्त झालेल्या प्रदेशामध्ये भावी काळात पुनश्च स्थैर्य व शांतता येऊ शकेल या दृष्टीने बहुमोल कार्य केले आहे ... या योजनेमुळे तेथील लोक व राष्ट्रे यांच्यात लोकशाही व मुक्त परस्परसहकार्य वृद्धिंगत होण्याच्या दृष्टीने भक्कम पाया घातला गेला आहे. ... येथील गनिमी युद्ध संपुष्टात येऊन शांततेची नवी आशा निर्माण झाली आहेच; शिवाय त्यांच्या शांतता कार्याचे महत्त्व मध्य अमेरिकेपुरतेच मर्यादित नाही."

[ याविषयीची थोडी वेगळी माहिती 'नवभारत'च्या नोव्हेंबर ८७ अंकातील 'सार-संकलन' या सदरात आलेली आहे. ]

## साहित्य

या वर्षीचे साहित्याचे नोबेल पारितोषिक आयोसिफ आलेक्झांड्रोव्हिचच ब्रॉड्स्की या रशियातून हद्दपार केलेल्या ज्यूइश कवीला देण्यात आले आहे. 'डॉ. झिवॅगो' या कलाकृतीसाठी बोरिस पास्तरनाक यांना १९५८ साली (त्यांनी ते नाकारले) व 'कॅन्सर वॉर्ड' करिता आलेक्झांडर सोल्झेनित्स्यीन यांना १९७० साली हे पारितोषिक देण्यात आले होते. अशा प्रकारे गेल्या तीन दशकांत रशियातून बाहेर पडावे लागलेल्या तीन साहित्यिकांना हा बहुमान मिळाला आहे.

ब्रॉड्स्की यांचा जन्म लेनिनग्राड येथे २४ मे १९४० रोजी झाला. माध्यमिक शालेय शिक्षणापुरतेच त्यांचे औपचारिक शिक्षण मर्यादित राहिले. आणि पौगंडावस्थेतच त्यांना जीवनाच्या रौद्रभीषण रूपाचे दर्शन झाले. १५ व्या वर्षीच शाळा सोडून ते पोटाची खळगी भरण्यासाठी एका कारखान्यात काम करू लागले व त्याच वर्षी म्हणजे १९५५ साली ते कविताही करू लागले. तेथील काम न आवडल्याने त्यांनी ती नोकरी सोडून दिली. त्यांच्या कविता प्रसिद्ध करायला कोणीच राजी नव्हते. ज्याच्या कविता विकल्या जात नाहीत व ज्याला इतर कोणतेच कामधाम नाही असा कवी प्रस्थापित अडाणी समाजाच्या दृष्टीने केवळ एक उडाणटप्पू, भारभूत माणूस होता. परिणामी 'सामाजिक बांडगूळ' (समाजाचे शोषण करणारा रिकामटेकडा माणूस) असल्याचा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला व एका कर्तव्यदक्ष न्यायाधिशाने खटल्याचे साग्रसंगीत नाटक पार पाडून कामगार न्यायालयामार्फत त्यांना ५ वर्षे सश्रम कारावासाची सजा फर्मावली व त्यांना आर्क्टिकमधील आर्खान्गेलस्क प्रदेशातील एका शासकीय शेतावर १९६४ साली धाडण्यात आले. पण दयाळूपणा दाखवून १८ महिन्यांनंतर नियोजित वेळेच्या आधीच त्यांची मुक्तता करण्यात आली. तरी त्यांची ठाम धारणा होती की, लेखन हे आपले 'मिशन' आहे आणि सत्ताधिशांना हवे तसे लेखन करून आपण आपली लेखनाची हौस भागवू नये किंवा त्यांना शरण जाऊन लेखन सोडून देऊ नये, असेच त्यांना वाटत राहिले. त्यांचे लेखन चालूच राहिले व त्यांच्या हस्तलिखित कवितांचा हातोहात प्रसार होऊ लागला. त्यामुळे परिस्थिती आणखीच बिकट झाली. यामुळे आपल्याला भयाण भवितव्याला सामोरे जावे लागेल याची त्यांना कल्पना होती. त्यांची अप्रतिष्ठा करण्यासाठी अधिकृत मोहीमच आखण्यात आली होती. या दडपशाहीच्या वेदनांतून त्यांनी 'द एंड ऑफ ए ब्युटिफुल इरा' ही विलापिका रचली. हे झोंबणारे गीत भूतकालीन भ्रमांवरचे होते व त्यात भावी काळाविषयी मर्मभेदक अनुमान केले होते. त्यातील शेवटच्या ओळीत संपूर्ण प्रारब्धाची झलक दिसून येत होती. त्या ओळी होत्या :

For the innocent hand
there is nothing in store but
an axe and the evergreen laurel

लंडनमधील पोएट्री इंटरनॅशनल तसेच स्पोलेटो येथील 'फेस्टिव्हल ऑफ टू वर्ल्ड्स' यांना हजर राहाण्यासाठी त्यांनी परदेशी जाण्याची परवानगी मागितली होती. पण ती नाकारण्यात आली (१९६९). यामुळे त्यांना विषण्णतेने घेरले होते. अशा प्रकारे त्यांचे 'अंतर्गत हद्दपारी'चे खडतर आयुष्य तसेच पुढे चालू राहिले. शेवटी एके दिवशी त्यांना सांगण्यात आले की, त्यांनी देशाची गरज पुरेशी भागविली असल्याने आता त्यांनी आपले चंबूगबाळे आवरून आपल्याच भल्यासाठी देशाबाहेर पडावे हे उत्तम! अशा प्रकारे १९७२ साली त्यांना मनाविरुद्ध मायभूमीला रामराम ठोकावा लागला. काही काळ व्हिएन्ना व लंडन येथे थांबून ते अमेरिकेला गेले व १९७२ च्या 'पोएट्री इंटरनॅशनल'ला ते हजर राहिले. पुढील एक वर्ष मिशिगन विद्यापीठात काढल्यावर नंतर एक वर्ष ते न्यूयॉर्कच्या क्वीन्स महाविद्यालयात होते. १९७४ नंतर निवासी कवी म्हणून ते अमेरिकेत राहिले व १९७७ साली अमेरिकेचे नागरिक झाले. ते लेखनाशिवाय अध्यापनही करतात. त्यांना अनेक सन्मानही मिळाले आहेत. उदाहरणार्थ, मॅक-आर्क प्रतिष्ठानाचा २.०८ लाख डॉलरचा पुरस्कार. त्यांचा मुलगा रशियात असतो व जवळजवळ या पंधरा वर्षांत पितापुत्रांची गाठभेट झालेली नाही.

१९७२ सालापर्यंत त्यांनी टीका-लेखन करण्याइतपत इंग्रजीचे ज्ञान संपादन केले होते. आणि इंग्रजी साहित्याविषयीचे त्यांचे गाढ प्रेम 'एलिजी फॉर जॉन डोन' मध्ये दिसून येते. त्यांनी इलियटच्या स्मृतिविषयी काव्य लिहिले आहे. कधीकधी ते आपल्याच साहित्याचा इंग्रजीत अनुवादही करतात. परंतु जेव्हा कविता लिहाविशी वाटते तेव्हा ते आपल्या मातृभाषेकडेच वळतात. रशियन भाषा त्यांच्या विचारांना आकार देते आणि मातृभूमीतील निसर्गदृश्ये त्यांच्या काव्यात येत राहातात. उदाहरणार्थ पुढील इंग्रजी अनुवाद पहा :

I was raisad by the cold that,
to warm my palm gathered
my fingers around a pen.

अशा प्रकारे एका अर्थी त्यांनी रशिया कधीच सोडलेला नाही.

तरुण रशियन कवींमध्ये 'लेनिनग्राड स्कूल' नावाने ओळखण्यात येणारा गट आहे व ब्रॉड्स्की या गटाचे मानले जातात. एक ठाम स्वाभाविक संयम व सांस्कृतिक परंपरांविषयी आदर ही या कवींची वैशिष्ट्ये होत. यांचा मागोवा अख्मातोव्हा यांच्यापर्यंत निश्चितपणे घेता येतो. ब्रॉड्स्की हे पुष्कीन यांच्या परंपरेतील कवी असून पास्तरनाक, अख्मातोव्हा, ऑसिप मांडलस्टाम आणि मारिना त्स्व्हेतायेव्हा या चौघांचे वारसदार म्हणून त्यांच्याकडे पाहिले जाते. काव्याचे रीतसर तंत्र, गहनता, उपरोध व भान या दृष्टींनी ते उच्च दर्जाचे कवी मानले जातात. त्यांच्या काव्यात समर्थ असा तत्त्वमीमांसक सूर आढळतो. जेव्हा ते स्वतः काव्यवाचन करतात तेव्हा व्यवस्थितपणे गुंफलेल्या शब्दांना एक प्रकारचे मंत्रसामर्थ्य येते. स्टालीननंतरच्या काळात उदयास आलेले ते एक असामान्य (काहींच्या मते सर्वांत थोर) रशियन कवी आहेत, असे मानले जाते.

ब्रॉड्स्की यांची भाषा यातना, छळ, वेदना यांतून आलेली असली, तरी विशेषकरून काव्यात ते संताप व्यक्त करताना हिंदी कवी 'धूमिल' यांच्याप्रमाणे संतप्त होत नाहीत, असे श्याम लाल यांना वाटते. काव्याचा उपाशीपोटी माणसाला काही उपयोग आहे का? असा सवाल करणारे कवी धूमिल मग स्वतःलाच पुढील प्रश्न विचारतात : 'व्याकरणाच्या नाकाभोवती हातरुमाल गुंडाळून आपण निष्ठा व विष्ठा असे यमक जुळवायला हवे की नको?' सडत चाललेल्या समाजाच्या दलदलीतून येणाऱ्या उग्र दुर्गंधीविषयीचा तिटकारा व्यक्त करण्याचा धूमिल यांचा हा मार्ग आहे. ब्रॉड्स्की यांनी एवढे कठोर व धगधगते लेखन कधीच केलेले नाही. त्यांच्या गद्यातून जरी थोडाफार कडवटपणा डोकावत असला तरी काव्यलेखन करताना ते आपल्या भावनांवर काबू ठेवतात. कारण कलेविषयीच्या त्यांच्या स्वतःच्या कल्पना वेगळ्या आहेत. आपल्या भावनांना मोकाट न सोडता त्यांना एक रूप द्यायचे काम आपले आहे, याचे भान त्यांना असते.

आपल्या गतजीवनाविषयी विचार करताना ब्रॉड्स्की यांना त्या काळाविषयी वाईट वाटत नाही वा मायभूमीच्या वियोगाचे दुःख होत नाही असे नाही. ज्या परिस्थितीतून त्यांना जावे लागले तिचे ओरखडे

त्यांच्या मनावर राहून गेले असले, तरी त्यांचा परिणाम त्यांनी आपल्या काव्याच्या शरीरावर व आत्म्यावर होऊ दिलेला नाही. कोणत्याही राजकीय रागालोभाने त्यांच्या काव्याची गंभीर शांतता ढळत नाही. आपल्या व्यक्तिगत गतजीवनापेक्षा पुढील गोष्टींच्या विचारांनी ते अधिक अस्वस्थ होतात : एकटेपणातून येणाऱ्या यातना, प्रेमाची भंगुरता, निर्मम काल-प्रवाह, भाषेतील अनिश्चितता व प्रत्येक सजीवावर पडत असणारे मृत्यूचे सावट या गोष्टींनी ते खरे अस्वस्थ होतात.

गद्यातून दिसून येणारा त्यांचा कडवपणा हा त्यांच्या तारुण्यावस्थेतील यातनांतून आलेला आहे. मात्र ज्यांच्याविषयी त्यांना प्रेमादर वाटत आला आहे त्या कवींच्या सुकून गेलेल्या जीवनाविषयी त्यांना अधिक खंत वाटते. उदाहरणार्थ, मांडलस्टाम, त्स्व्हेतायेव्हा व आख्मातोव्हा. झाडनाव्ह यांनी आख्मातोव्हा यांची " अर्धी वेश्या व अर्धी रुग्णसेविका ' अशी संभावना केली तेव्हा त्या काळात त्यांना हे उद्‌गार मृत्युदंडासारखे वाटले असतील, असे ब्रॉड्स्की यांना वाटते. मांडलस्टाम यांच्या विधवा पत्नीने नंतर दीर्घकाळ कष्टाने त्या काळाविषयीच्या स्मृती लिहून, जपून ठेवल्या. याबद्दल ब्रॉड्स्की यांना आनंद वाटतो. ते या स्मरणगाथेविषयी म्हणतात : " पुढे जाणारी ही (स्मरणांची) आगगाडी एका छळछावणीपाशी थांबणार आहे हे तिला चांगले माहीत होते. मात्र ते स्टेशन चुकले हे तिचे सुदैव, तर त्याविषयी आपल्याला तिने सांगितले हे आपले भाग्य. "

आर्क्टिकमधल्या एकांतवासातील थंडगार क्रौर्याची भावना व्यक्त करताना सुद्धा ते तेथील श्रम-छावणीचे चित्र आपल्या डोळ्यांसमोर आणण्याऐवजी ते त्या गारठलेल्या समुद्राची प्रतिमा आपल्यासमोर उभी करतात. अशा समुद्रातील " मासे स्वतःचे डोळे हिमावर घासून घेतात " अथवा " हिमनगासमोर नतमस्तक होऊन मृत्यूपासून पोहत दूर जातात. " या ठोस प्रतिमांमुळे वाचकच नव्हे तर कवीही अस्वस्थ होतो, ते म्हणतात : " मासोळीवरच्या ( अशा ) कविता माशांप्रमाणेच बशात अडकतात." रशियातील ज्यू लोकांच्या व्यथा व्यक्त करण्यासाठी त्यांनी लेनिनग्राडच्या गावकुसाबाहेरील दफनभूमीचा उपयोग करून घेतला आहे. ' द ज्यूइश सिमेटरी ' या कवितेत पुढील वर्णन आहे : या दफनभूमीच्या आठवणी व कुजक्या प्लायवुडचे कोलमडायला आलेले कुंपण यांनी या दफनभूमीला एकत्र बांधून ठेवले आहे." काळोख व जॉन डोन यांच्यावरच्या काव्यातील निद्राग्रस्त वस्तूंच्या प्रतिमा याहून अस्वस्थ करणाऱ्या आहेत. " रात्र सर्वत्र : कोपऱ्यांमध्ये, बिछान्यांमध्ये, माणसांच्या डोळ्यांत, डेस्कवरच्या कागदांत, बोललेल्या शब्दांत, भाषणांत, सरपणात, चिमटयात, सध्या थंड असलेल्या घर उबदार ठेवणाऱ्या भट्टीच्या कोपऱ्यात, प्रत्येक ठिकाणी ! " (काळोख आहे)

वास्तवता त्यांच्या मते अर्थहीन असते व केवळ जाणिवेमुळे तिला अर्थ प्राप्त होतो. कलेच्या संदर्भात त्यांचे मत असे आहे : ज्या प्रमाणात जीवन भाषेच्या लोलकातून वक्रीभूत होऊन पार जाते, त्या प्रमाणात त्याचे प्रतिबिंब कलेत उमटत नाही. लेखक भाषा घडवतो व त्यात कलेचे गूढ दडलेले असते. म्हणून लेखक त्यांना अर्थपूर्ण वाटतो. अशा लेखकांचे साहित्य उलगडून दाखविताना ते नेहमीच या भाषेच्या घडणीचा मागोवा घेतात. वास्तवतेचे अगदी तपशीलवार वर्णन करताना सुद्धा आधुनिक रशियन साहित्यात निरर्थकतेवर व अतिवास्तववादी लेखनावर आसूड का ओढण्यात येत नाही, याचे त्यांना राहून राहून आश्चर्य वाटते. या संदर्भात ते सोल्झेनित्स्थिन यांच्या ' कॅन्सर वार्ड ' मधील एका प्रकरणाचे उदाहरण देतात. या संपूर्ण प्रकरणात स्त्री-डॉक्टरच्या दैनंदिन कष्टप्रद कामांचे तपशीलवार वर्णन देऊन ते वाचकांना चांगलेच बोअर करतात; मात्र निरर्थकतेची छटा असणाऱ्या स्फोटक मुद्द्यावर ते कधीच प्रहार करीत नाहीत, असे ब्रॉड्स्की यांना वाटते. यामुळेच ब्रॉड्स्की यांना प्लॅटोनॉव्ह हे त्यामानाने कमी प्रसिद्ध असलेले लेखक अधिक मोठे वाटतात. कारण प्लॅटोनॉव्ह यांच्याजवळ स्वतःचे शब्द त्यांच्या तार्किक वा निरर्थक अंतिम उद्दिष्टांपर्यंत नेण्याची धमक व कल्पनाशक्ती आहे.

ज्याप्रमाणे भाषेच्या गूढतेमुळे ब्रॉड्स्की यांची जिज्ञासा चाळविली जाते, त्याचप्रमाणे भाषेच्या गूढतेची त्यांना भुरळही पडते. त्यांची एक उत्कृष्ट कविता म्हणजे दोन पात्रांतील संभाषण असून त्यात भाषेचे गूढ हुडकून काढण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. यांपैकी एक पात्र भुकेलेले शब्द पुष्कळदा त्यांच्या ' आशयांविरुद्ध जाऊन त्यांना कसे खाऊन टाकतात ' असे म्हणते तेव्हा दुसऱ्या पात्राचा युक्तिवाद असा असतो : ' शब्द हे आशयाविरुद्धच्या ढालीही असतात.' (यावरून शब्द हे

जीवनाच्या सार्थकतेविरुद्धचे संरक्षण आहेत, हा निष्कर्ष ध्वनित होतो). हा संवाद पुढे चालू राहतो व एक पात्र पुढील युक्तिवाद करते : "ज्यांनी आपला आशय गमावला आहे त्या शब्दांच्या आडपडद्याएवढे अभेद्य काहीही असू शकत नाही आणि मानवी भाषेपेक्षा कोणतीही गोष्ट अधिक पीडादायक असू शकत नाही." यावर दुसरे पात्र लगेचच उत्तर देते; "शब्द हेही आशय (वस्तू) आहेत व (यामुळे) आपण बचावलो आहोत."

भाषेच्या मर्यादा ह्या नेहमीच शब्दांच्या मर्यादा असतात का ? तशा त्या नेहमीच नसतात, असे ब्रॉड्स्की यांना वाटते. तीव्र यातनांना सामोरे जाताना किंवा परमानंदाच्या क्षणी आपले शब्दच हरवतात आणि आपले भावविश्व आपल्या भाषेच्या मर्यादेपलीकडे गेलेले असते. यानंतरच हेन्री मूर यांच्या शिल्पातील छिद्राप्रमाणे निःशब्दतेला वा मौनाला अर्थ प्राप्त होतो. बोलण्यातील कौशल्य व निःशब्दता ( मौन ) नसती तर खुद्द भाषाच अधिक बापुडवाणी ठरली असती. यामुळेच ब्रॉड्स्की आपल्या नीरवतेवरील पुढील कल्पनारम्य काव्याने आपल्या भाषेविषयीच्या प्रतिक्रियेचा शेवट करतात :

And silence is the future of all days
That roll towards speech yes,
silence is the presence
Of farewells in our greetings
as we touch
Inded the future of words is silence

त्यांच्या हद्दपार मनाची भाषा पुढील कवितेत दिसून येते. एकाकीपण, यातना, अनिश्चितता व आशा-निराशेकडे नेणारी ही भाषा आहे :

Having sampled two
Oceans as well as continents
I feel that I know
What the Globe itself must feel
There is nowhere to go

अशा तऱ्हेने त्यांच्यातील ठावठिकाणा नसलेला माणूस त्यांच्या काव्यात, बोलण्यात आणि कल्पनाविलासातही डोकावत असतो. उदाहरणार्थ,

The simply lay down in the
cold earth like seeds
And fell asleep forever
They were covered with earth
And candle were lit
And on the Day of Atonement
Hungry old men in loud voices
Choking with cold
Wailed about eternal rest
And they achieved it,
As dust, unto which they returned

ब्रॉड्स्की यांची प्रसिद्ध झालेली पुस्तके पुढीलप्रमाणे आहेत : ए ख्रिसमस बॅलड (१९६२), एलिजी फॉर जॉन डोन (१९६३), आयझॅक अँड अब्राहम (१९६३), न्यू स्टांझाज टू ऑगस्टा (१९६४), आइनेन आल्टेन आर्किटेक्टेन इन रोम (१९६४), व्हर्सेस ऑन द डेथ ऑफ टी. एस्. इलियट (१९६५), व्हर्स अँड पोएम्स (१९६५), Collines et sutren poemes (फ्रेंच अनुवाद, १९६६), Gediche (जर्मन अनुवाद, १९६६), एलिजी टू जॉन डोन अँड ऑदर पोएम्स (इंग्रजी अनुवाद, १९६७), साँग विदाउट म्युझिक (१९६९), ए स्टेप इन द डेझर्ट : व्हर्स अँड पोएम्स (१९७०), सिलेक्टेड पोएम्स (१९७३). अमेरिकेत आल्यापासून त्यांनी थोडेच लेखन केले असून पार्ट ऑफ ए स्पीच (१९८०) यासह तीन कवितासंग्रह अनुवादित केले आणि लेस दॅन वन (१९८६) हा निबंधसंग्रह प्रसिद्ध केला आहे. इलुस्ट्रेटेड विकली ऑफ इंडियाचे संपादक प्रितीश नंदी यांनी ब्रॉड्स्की यांच्या कवितांचा एक संपूर्ण अंक पुष्कळ पूर्वी संपादित केला होता. ब्रॉड्स्की यांनी दोस्तोव्हस्की त्स्व्हेतायेव्हा यांच्या साहित्याविषयी समीक्षाग्रंथही लिहिले आहेत.

रशियात ब्रॉड्स्की यांचे साहित्य प्रसिद्ध करण्यास बंदी आहे. मात्र आता 'डॉ. झिवँगो' प्रसिद्ध करायला परवानगी मिळाली आहे. त्यामुळे आज ना उद्या रशियनांना ब्रॉड्स्की यांचे साहित्यही वाचायला मिळेल, अशी अपेक्षा करता येते. तसेच या पारितोषिकामुळे त्यांना मायदेशाकडून बोलावणे येईल का, अशीही उत्सुकता वाटू लागली आहे.

## अर्थशास्त्र

विविध निर्मिती अथवा उत्पादन घटकांचा आर्थिक विकासावर कसा परिणाम होतो हे दर्शविणारे

सूत्र, प्रतिकृती अथवा सिद्धांत मांडल्याबद्दल रॉबर्ट मेर्टान सोलो यांना या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल स्मृति-पारितोषिक देण्यात आले आहे, १९६८ साली स्वीडनच्या मध्यवर्ती बँकेने सुरू केलेले हे पारितोषिक मिळविणारे सोलो हे १५ वे अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ आहेत. याविषयीचा त्यांचा महत्त्वाचा लेख 'ए काँट्रिब्युशन टू द थिअरी ऑफ इकॉनॉमिक ग्रोथ' हा क्वार्टर्ली जर्नल ऑफ इकॉनॉमिक्स या त्रैमासिकात १९५६ साली प्रसिद्ध झाला होता. वाढलेल्या भांडवल-साठ्यामुळे दरडोई उत्पन्न कसे वाढते हे स्पष्ट करणारे हे सूत्र आता पाठ्यपुस्तकात समाविष्ट झाले आहे. राष्ट्रीय विकासाचा वेग काढण्यासाठी जागतिक बँक व पुष्कळ देश या सूत्राचाही उपयोग करतात. बचतीतून होणारा भांडवल-पुरवठा व कामगारांचा पुरवठा या सूत्रात विचारात घेण्यात आलेला आहे. यावरून त्यांनी काढलेला पुढील निष्कर्ष रॉयल स्विडिश अकादमीला महत्त्वाचा वाटतो : 'शेवटी राष्ट्राची अर्थव्यवस्था विकासाच्या अशा एका टप्प्यापर्यंत येऊन पोचते की, त्यानंतर होणारा विकास हा केवळ तंत्रवैज्ञानिक प्रगतीनुसार होतो.' म्हणजे उद्योगप्रधान देशात कामगारांची संख्या किंवा नव्या कारखान्यांमधील वा साधनसाहित्यांतील भांडवल यांत वाढ करण्यापेक्षा तंत्रवैज्ञानिक प्रगतीचा वेग वाढविल्यास आर्थिक विकास जलद होतो. अशा प्रकारे तंत्रवैज्ञानिक प्रगतीला चालना देणाऱ्या विद्यापीठांना व संशोधकांना अधिक साधनसंपत्ती उपलब्ध करून द्यायला हवी, या बाबतीत सोलो यांनी उद्योगप्रधान देशांची खात्री पटविली असल्याचे या समितीचे अध्यक्ष अॅसार लँडबँक यांना वाटते. उदाहरणार्थ, तंत्रवैज्ञानिक संशोधन व विकासकार्यांकडे पैसा वळविण्याच्या अमेरिकेच्या शासकीय धोरणामुळे जेट हवाई वाहतूक व संगणक यांचा विकास होऊ शकला. या सूत्राचा नंतरच्या अर्थशास्त्रीय विश्लेषणावर मोठा ठसा उमटला आहे. कारण आर्थिक विकासाच्या प्रक्रियेचे विश्लेषण करण्याचे हे केवळ एक साधन असल्याने त्याचे विविध मार्गांनी व्यापकीकरण करता येऊ शकते. या सिद्धांतामुळे एक सैद्धांतिक साचा वा रचना निर्माण झाली आहे व ती आर्थिक विकासापलीकडील घटकांचे विवेचन करताना तसेच विकासाला विविध उत्पादन-घटकांमार्फत होणाऱ्या मदतीचे मूल्यमापन करताना वापरता येऊ शकते. अशा प्रकारे या साच्यात स्थूल अर्थशास्त्रीय सिद्धांत मांडता येऊ शकतो.

सोलो यांच्या आर्थिक विकासाविषयीच्या या सिद्धांताचा आधार हॅरोड-डोमार प्रतिकृती हा होता. भारताच्या १९५२ ते १९६५ पर्यंतच्या योजनाही हॅरोड-डोमार व नंतर फेल्डमान-महालनोबीस या प्रतिकृतींवर आधारलेल्या होत्या. त्यामुळे सोलो यांच्या विशेषतः आधीच्या काळातील संशोधनाविषयी भारतात पुष्कळ चर्चा झाली व हा सिद्धांत भारताच्या संदर्भात महत्त्वाचा आहे, हे उघडच आहे भारताने ज्या प्रतिकृतींचा आधार घेतला त्यांच्या गाभ्याशी भांडवल व त्याचा योग्य प्रकारे विस्तार करणे या बाबी होत्या. भांडवलाची उभारणी परकी व स्थानिक बचतीवर अवलंबून असल्याने नियोजनकारांचे पुष्कळसे लक्ष देशातील बचतीचा वेग व परकी भांडवलाचा ओघ यांवर केंद्रित झालेले होते. तथापि भारतात भांडवलगुंतवणुकीचे प्रमाण उच्च व बचत-गुंतवणुकीचा वेग १८ टक्के असूनही त्याची अपेक्षेएवढी चांगली फळे मिळाली नाहीत. तंत्रविज्ञानातील संथ प्रगती व तंत्रविद्या आत्मसात करण्यातील शैथिल्य ही यामागील कारणे आहेत. १९५०-५१ ते १९७९-८० या काळात भारताच्या दीर्घकालीन विकासाच्या वेगात ८ टक्के वाढ झाली, तर यामुळे वार्षिक विकासाच्या वेगात केवळ ०.२९ टक्के वाढ झाली (याच काळात ही वाढ हाँगकाँगमध्ये ४.३३, जपानमध्ये ६.३६ व द. कोरीयात ४.९९ टक्के एवढी झाली).

सोलो यांनी दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळातील आर्थिक विकासाचा वेग निश्चित होण्यामागे तंत्रवैज्ञानिक प्रगतीचा वाटा मोठा असतो, या मुद्द्यावर सर्वाधिक भर दिलेला आहे. मात्र त्यांनी इतर क्षेत्रांतही संशोधन केले असून त्यांपैकी काही प्रमुख कार्यक्षेत्रे अशी आहेत : भांडवलविषयक सिद्धांतात मोलाची भर टाकली; साकलिक (वा स्थूल) अर्थशास्त्रातील चलनवाढीचा सिद्धांत, बेकारीविषयक धोरण व पर्यावरण यांच्याशी निगडित असलेल्या प्रश्नांविषयी संशोधन केले आहे.

अर्थकारणातील शासकीय हस्तक्षेपाचा ते हिरीरीने पुरस्कार करतात. १९६०-६५ या काळात अमेरिकन अध्यक्षांच्या आर्थिक सल्लागार मंडळाचे ते सदस्य होते. तेव्हा कॅनेडी व जॉन्सन यांच्या काळातील शासकीय हस्तक्षेपाच्या धोरणांना आकार देण्यास त्यांनी साहाय्य केले होते. बाजारात स्वाभाविकपणे निर्माण होणारे असंतुलन सुधारण्यासाठी सरकारने हस्तक्षेप केला


अनुक्रमणिका

पाहिजे, या त्यांच्या धोरणाला रेगन प्रशासनाने विरोध केला. त्यामुळे रेगन–अर्थशास्त्रीय धोरणांविषयी त्यांना तिटकारा वाटतो व ही अप्रीती त्यांनी कधीच लपवून ठेवली नाही. म्हणून ते आपल्या तिरकस शैलीत म्हणतात : "रेगन–अर्थकारणाविषयी जास्तीत जास्त चांगले काही म्हणायचे झाले, तर ते म्हणजे हे अर्थकारण कदाचित दुर्लक्ष करण्याच्या लायकीचे आहे."

सोलो हे केवळ आर्थिक विकासाविषयीच्या सिद्धांताचे अभ्यासक नाहीत; तर ते निष्णात थोर शिक्षक, सिद्धहस्त लेखक तसेच उत्साही, मिश्किल व छाप पाडणारे पट्टीचे वक्तेही आहेत. अभ्यासविषयक व्याख्यानातही त्यांच्या रंजक व विनोदी शैलीचा, त्यांच्या बहुश्रुततेचा व त्यांच्या उदात्त शैक्षणिक विचारसरणीचा ऐकणाऱ्याला प्रत्यय येतो. त्यांनी लिहिलेले निबंध व पुस्तकांची परीक्षणे ही अर्थशास्त्रीय विश्लेषणासारखा विषयही रंजक व वाचनीय असू शकतो, याची निदर्शक आहेत. जॉर्ज गिल्डर यांच्या 'द एंटरप्रिनर अँज हिरो' या पुस्तकाच्या परीक्षणाची त्यांनी केलेली सुरुवात अशी होती : "केवळ विनोदबुद्धी असणाऱ्या व्यक्तीचाच हे पुस्तक वाचताना टिकाव लागू शकेल आणि थोडीही विनोदबुद्धी नसणारा कोणीही हे पुस्तक लिहू शकला नसता." जगातील विविध शेअर बाजारात शेअरच्या किंमती नुकत्याच मोठ्या प्रमाणात घसरल्या. त्यावर सोलो यांनी व्यक्त केलेली प्रतिक्रिया एका निरीक्षकाची असली, तरी आकर्षक आहे. ते म्हणाले : "अमेरिकेची आंतरराष्ट्रीय व्यापारातील तूट व अमेरिकेच्या अंदाजपत्रकातील तूट ही या घसरगुंडीमागील कारणे आहेत. या दोन तुटींमुळे अमेरिका अशा अवस्थेपर्यंत येऊन पोचली आहे की, आता तिला परदेशी कर्ज घेऊन खर्चासाठी अर्थप्रबंध करावा लागेल. याचा अर्थ गेली सहा-सात वर्षे जे लोक स्वतःसाठी जो खड्डा खणत होते त्यातून बाहेर पडण्यासाठी त्यांना आता अनेक वर्षे प्रयत्न करावे लागतील. ...अमेरिका हा स्वतःच्या यशावर उभा राहिलेला देश आहे. वस्तुतः तुम्ही अधिक आशादायी भवितव्याकडे वाटचाल करतानाच या देशाला पाहिले आहे आणि ज्या वेगाने ही घोडदौड चालू होती तो वेग काही काळ घटेल इतकेच." ते स्वतः शेअरबाजारविषयक तज्ज्ञ नाहीत; पण त्यांच्या मते या घसरगुंडीतून गंभीर आर्थिक समस्या निर्माण होईल असे वाटत नाही. उलट यातून अजूनही काही चांगले घडू शकेल असेही ते म्हणतात. जर यामुळे हुशार पदवीधर विद्यार्थ्यांचा गुंतवणूक-बँकांकडील ओघ कमी झाला, तर "त्यांच्यामधून काही अभियंते निर्माण होऊ शकतील. (म्हणजे) आपत्तीची फळे (ही) मधुर असतात," असे ते हसून म्हणाले होते.

सोलो यांचा जन्म ब्रुकलीन (न्यूयॉर्क) येथे २३ ऑगस्ट १९२४ रोजी झाला. त्यांचे शिक्षण हार्व्हर्ड विद्यापीठात झाले असून त्यांनी अर्थशास्त्राची पीएच्. डी. पदवी संपादन केली आहे. त्यांचा विवाह १९४६ साली बार्बारा लुईस यांच्याशी झाला असून त्यांना २ मुलगे व १ मुलगी आहे. ते मॅसॅच्यूसेट्स इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजीत १९४९ साली सहप्राध्यापक म्हणून लागले व १९७३ पासून तेथे प्राध्यापक म्हणून आहेत. केंब्रिज, रॉटरडॅम, स्टॉकहोम, ऑक्सफर्ड, डब्लीन, बर्मिंगहॅम या विद्यापीठांतून त्यांना व्याख्यानासाठी बोलाविण्यात आले होते. त्यांना देशी-विदेशी संस्था-संघटनांचे सदस्यत्व, विविध पारितोषिके व पुरस्कार तसेच अनेक विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या वगैरे बहुमान मिळाले आहेत. त्यांनी अनेक लेख व पुस्तके लिहिली असून त्यांची काही पुस्तके पुढीलप्रमाणे होत : 'लिनियर प्रोग्रॅमिंग अँड इकॉनॉमिक ॲनॅलिसिस' (१९५८), 'कॅपिटल थिअरी अँड द रेट ऑफ रिटर्न' (१९६३), सोर्सेस ऑफ अनएंप्लॉयमेंट इन द युनायटेड स्टेट्स' (१९६४), 'प्राइस एक्स्पेक्टेशन्स अँड बिहेव्हियर ऑफ द प्राइस लेव्हल' (१९७०), 'ग्रोथ थिअरी : अँन एक्स्पोझिशन' (१९७०).

सोलो यांना संगीताची आवड असून शिडाची होडी चालविणे हा त्यांचा सर्वांत आवडीचा छंद आहे. मार्थाज व्हाइनयार्ड येथील उन्हाळी निवासात त्यांचे स्वतःचे एक २४ फुटी शिडाचे जहाज आहे. नोबेल पारितोषिकातील काही पैसे ते या जहाजावर एक नवीन पोगी किंवा जिनोआ जिब (म्हणजे विशेषतः स्पर्धेत अधिक वेग मिळविण्यासाठी वापरण्यात येणारे त्रिकोणी शीड) बसविण्यासाठी खर्च करणार आहेत. ते स्वतःला एक गरीब शिक्षक म्हणत असले, तरी ते अर्थशास्त्रज्ञांचे अर्थशास्त्रज्ञ आहेत. यामुळेच १९७३ सालच्या अर्थशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी व्हॅसिली लेओन्टीफ यांनी सोलो यांना हे पारितोषिक मिळाल्यावर पुढील उद्गार काढले होते : "सोलो हे आमच्या क्षेत्रातील सर्वोत्कृष्ट संशोधक असल्याने (या बातमीने) मला खूप आनंद झाला आहे."








# देहाबाहेर गेल्याचा अनुभव

व. वि. अकोलकर

'मी स्वतःच्या भौतिक देहाच्या बाहेर गेलो व त्या देहाकडे काही अंतरावरून पाहू लागलो' अशा प्रकारचा देहबाह्यतेचा अथवा देहविलगतेचा अनुभव (Out of Body Experience– OBE) अनेक व्यक्तींनी निवेदन केलेला आहे. या प्रकारच्या अनुभवांकडे गेल्या शतकात सर विल्यम बॅरेट यांनी लक्ष दिले होते. अलीकडे पुष्कळांनी अशा अनुभवांचे संकलन केले आहे व सर्वेक्षण पद्धतीचाही अवलंब केला आहे.

देहविलगतेच्या अनुभवाचे 'स्व'विषयक संवेदनातील विकृती म्हणून निदान (diagnosis) करण्याचा मोह मानसचिकित्सकांना (clinicians) होण्याचा संभव असतो. परंतु डॉ. गॅबर्ड व ट्वेमलो यांनी त्यांना बजावले आहे की, तसे निदान करू नये. अनुभवाचा एक विशेष स्वरूपाचा प्रकार म्हणून त्याकडे पाहिले पाहिजे असे त्यांचे मानसचिकित्सकांना सांगणे आहे.[१]

या दोन लेखकांनी तसेच इतर वैद्यकविशारदांनी व मनोवैद्यांनी या अनुभवाच्या वैशिष्ट्याकडे लक्ष वेधले आहे व तो मनोविकृतींच्या सदरात पडत नाही हे दाखवून दिले आहे.

'स्वतःच्या देहापासून वेगळे होऊन त्याकडे दुरून पाहात असल्याची जाणीव' हे या अनुभवाचे व्यवच्छेदक (खास) लक्षण असल्यामुळे त्याची गणना 'स्वप्न' या सदरात करता येत नाही. कारण व्यक्ती स्वप्न पाहात असते त्या वेळी 'मी शरीराबाहेर आहे व त्याकडे दुरून पाहात आहे' असा अनुभव येत नसतो. दुसरी गोष्ट अशी, की स्वप्न पाहणाऱ्याच्या बुबुळांची जलद हालचाल (REM) होत असते. देहविलगतेचा अनुभव घेत असलेल्यांच्या बाबतीत बुबुळे निश्चल असतात. आणखी कारण असे, की स्वप्न पडत असताना या स्नायूंचा विद्युत्आलेख (EMG) व देहविलगता अनुभवाच्या वेळचा आलेख यांमध्ये फरक आढळतो.

मनोविकृतिदर्शक असा ऑटोस्कोपी (*Autoscopy*) म्हणजे स्वतःच स्वतःला दिसणे हा प्रकार व देहविलगतेचा अनुभव हेही एकरूप नव्हेत. विकृतिमूलक ऑटोस्कोपीमध्ये रुग्णास असे वाटत असते, की स्वतःच्या शरीरासारखेच दुसरे एक शरीर आहे व ते काहीतरी करीत आहे. देहविलगतेच्या अनुभवात एकमेकांसारखी दोन शरीरे असल्याचा भ्रम नसतो.

'व्यक्तित्व-विलेपन' (depersonalisation) ह्या विकृतीच्या सदरातही देहविलगतेचा अनुभव पडू शकत नाही. कारण, त्या विकृतीचे लक्षण म्हणजे 'मी म्हणून कोणी नाहीच', किंवा, 'मी दुसराच कोणी तरी आहे, हे शरीर माझे नाही' असे वाटणे. देहविलगतेचा अनुभव घेणारी व्यक्ती स्वतःच्या देहाकडे स्वतःचा देह म्हणून (पण दूर अंतरावरून) पाहात असते.

छिन्नमानस (schizophrenia) ह्या विकृतीत कधीकधी स्वतःच्या देहाच्या सीमा बिस्तार पावल्या आहेत किंवा संकोच पावल्या आहेत असा भ्रम होत असतो. तसा काहीच भ्रम देहविलगतेच्या अनुभवात नसतो.

देहविलगतेचा अनुभव म्हणजे मेंदूच्या कार्यात दोष निर्माण झाल्यामुळे होणारा भास (hallucination) नसतो. वैद्यकविशारद डॉ. सॅबोम यांनी दाखवून दिले आहे, की हा अनुभव कित्येकांना आसन्नमरण अवस्थेत आलेला आहे व त्यांमध्ये काहीजण असे होते, की ते तापाने फणफणलेले नव्हते; त्यांना भ्रम (वात–delirium) झालेला नव्हता; गुंगीचे औषध दिलेले नव्हते; मेंदूला विषारी द्रव्यांमुळे धक्का पोचलेला (toxic shock) नव्हता; प्राणवायू कमी पडलेला (hypoxia) नव्हता; व कर्बवायूचे आधिक्य (hypercarbia) नव्हते.[२]

या सर्व कारणांस्तव, देहविलगतेच्या अनुभवाचा, एक वेगळा प्रकार म्हणून अभ्यास केला जात आहे. ह्या

अनुक्रमणिका







प्रकारचा अनुभव केव्हा येण्याचा संभव असतो? त्याच्या तपशिलात विविधता असते काय? तो अनुभव कोणत्या मानसिक प्रक्रियांचा परिणाम असावा? विशिष्ट स्वरूपाच्या व्यक्तित्वाशी त्याचा संबंध असू शकेल काय? इत्यादी प्रश्नांना अनुलक्षून या अनुभवाची स्वरूपमीमांसा (phenomenology) करण्यात येत आहे.

परामानसशास्त्रीय अभ्यासकांना वरील सर्व प्रश्नांमध्ये तर रस आहेच; परंतु आणखी तीन कारणांस्तव ते देहविलगतेच्या अनुभवाचा अभ्यास करीत आहेत. एक कारण म्हणजे सामान्य मानसशास्त्रात मनुष्याच्या स्वरूपाविषयीचे जे विवेचन सामान्यतः आढळते, त्याच्या पलीकडे जाऊन विचार करावयास लावणारा हा अनुभव आहे. दुसरे कारण असे, की देहविलगतेचा अनुभव अतींद्रिय ज्ञान होण्यास अनुकूल असावा, असे उदाहरणांच्या आधारे दिसून आले आहे. तिसरे व अधिक महत्त्वाचे कारण असे आहे : माणसाच्या देहातून, सूक्ष्म स्वरूपातील भौतिक द्रव्याच्या आश्रयाने का होईना, ज्ञानक्षम व कृतिक्षम असे काहीतरी खरोखरच बाहेर जाऊ शकते असे जर आढळून आले तर त्याचा स्थूल देहाशी असलेला संबंध प्राणोत्क्रमणाच्या वेळी तुटत असेल व काही काळ तरी ते अस्तित्वात राहात असेल अशी कल्पना करता येईल. अर्थातच मरणोत्तर अस्तित्वाच्या शक्यतेचा अप्रत्यक्ष पुरावा मिळाल्यासारखे होईल. साहजिकच त्या दृष्टीने प्रयोग करण्यात येत आहेत.

देहविलगतेच्या अनुभवांच्या बाबतीत असे दिसून आले आहे, की हा अनुभव कोणत्याही वयात येऊ शकतो. ४/५ वर्षांपासूनच्या मुलापासून तो वृद्धावस्थेतील व्यक्तींनी ही अवस्था अनुभवलेली आहे. श्री. सुधाकर डोईफोडे (नांदेड) यांना "लहानपणी व किशोरावस्थेत, माझा आत्मा देहापासून वेगळा झाला आहे असे दोनतीनदा जाणवले."

इंगो स्वान हे अमेरिकन लेखक व कलावंत सांगतात, की चौथ्या-पाचव्या वर्षी (टॉन्सिलची शस्त्रक्रिया होत असताना) त्यांना असा अनुभव आला होता.

### प्रसंगांची विविधता

देहाबाहेर असल्यासारखा अनुभव येण्यास निमित्तकारण म्हणून अनेक प्रकारचे प्रसंग असू शकतात. कार्ल युंग हे मानसशास्त्रज्ञ सांगतात, की ते **बिकट प्रसंगात** असतेवेळी त्यांना तसा अनुभव येत असे. काही जणांना **पक्षाघात** (लकवा) झाला त्या वेळी आलेला आहे. काही व्यक्तींना तो अनुभव त्यांच्या **जिवास धोका** होता अशा वेळी आलेला आहे. १९४४ साली रणगाड्यास गोळा लागून एक ब्रिटिश अधिकारी बाहेर फेकला गेला, त्या वेळी त्याला आलेला अनुभव असा :

"मी एकाऐवजी दोन झालो. एक 'मी' पेट घेतलेल्या कपड्यांनिशी जमिनीवर पडलेला व हातपाय झाडीत असलेला; दुसरा 'मी', २० फूट अंतरावर हवेत तरंगणारा व जमिनीवरील 'मी' कडे व रणगाड्याकडे पाहणारा."

कॉलरा होऊन प्राणांतिक अवस्था झालेल्या एका स्त्रीने लिहिले आहे :

'माझी चेतना विभागली गेली. एक भाग शरीराशी निगडित होता; दुसरा भाग 'माझा' होता. शरीराशी निगडित असलेल्या चेतनेचे विघटन होत चालले आहे, असे मला वाटले. शरीर दुरून दिसत होते इतकेच नव्हे, तर माझे लक्ष जेथे जेथे वळत होते तेथील– घर, लंडन, स्कॉटलंड, वगैरे ठिकाणची– वस्तुस्थिती मला स्पष्ट दिसत होती."

इंगो स्वान यांना त्यांच्यावर **शस्त्रक्रिया** होत असताना (वयाच्या चौथ्या-पाचव्या वर्षी) देहविलगतेचा अनुभव आला होता व शरीरापासून ३।४ फूट उंच गेल्यासारखे वाटले होते.

**तंद्रावस्था** प्राप्त झालेल्या काही 'माध्यमांना' स्वतः देहाबाहेर असल्यासारखा अनुभव आलेला आहे. रेव्ह. स्टेंटन मोझेस यांनी टिपून ठेवलेला अनुभव असा :

"जोपर्यंत माझा हात (मृतात्म्याचा) संदेश लिहीत होता, तोपर्यंत माझे 'स्पिरिट' शरीरापासून अलग झालेले होते. हात लिहीत आहे हे दुरून दिसत होते. मी शरीराकडे तसेच खोलीतील वस्तूंकडे बघितले. एका प्रकाशशलाकेने मी माझ्या शरीराशी जोडलेलो असल्याचे मला दिसले. शरीरावर सौम्य सुखद प्रकाश छतातून पडत होता. शरीरास कंप व आचके येत होते."

**शवासनात** देहविलगतेचा अनुभव पुष्कळांना आला आहे. शवासनात संपूर्ण शरीर शिथिल अवस्थेत असते, शरीरांतर्गत प्रक्रियामूलक संवेदने अत्यल्प प्रमाणात असतात, मेंदूचे कार्यही अत्यल्प प्रमाणात होत असते. प्रा. के. व्ही. बेलसरे *स्वतःचा अनुभव सांगतात :


अनुक्रमणिका

"मी देहाच्या बाहेर येत आहे अशी जोराने भावना करावयाची... एके दिवशी शवासनावर पडून वरील भावना केल्याबरोबर मी, (म्हणजे माझा सूक्ष्म देह) स्थूल देहाच्या बाहेर आलो व क्षणभर माझ्या शरीराकडे बघत राहिलो. ... काय झाले ते ध्यानात येण्याच्या अगोदर मला एकदम बेशुद्धी आली आणि पाऊण तासाने मी परत शुद्धीवर आलो."

"साक्षित्वा'चा अभ्यास साधला म्हणजेही देहापासून वेगळे असल्याचा अनुभव येऊ शकतो. साधक व तत्त्वचिंतक सांगतात की साक्षित्वाच्या अभ्यासामुळे, 'शरीर म्हणजेच मी' या समजुतीस कारणीभूत असणाऱ्या भावना क्षीण होत जातात.

प्रो. वेलसरे लिहितात :'दिवसभर कर्मे करीत असता आपण वेगळेपणाने राहावे आणि दुजेपणाने त्याच्याकडे पाहावे.''ते अनुसंधान सतत ठेवण्याचा अभ्यास करावा लागतो.

काही प्रसंगी निरूपण चालू असता "मी स्वतः माझ्यापासून बाजूला होतो व देहातून (मुखातून) बाहेर पडणारे विषय प्रतिपादन इतर श्रोत्यांप्रमाणे ऐकतो" असा अनुभव त्यांनी निवेदन केला आहे.[३]

**मृत्यू नजीक** आला असतेवेळी, देह सोडून बाहेर गेल्याचा अनुभव आल्याची हजारो उदाहरणे आहेत. गेल्या शतकात सर विल्यम बॅरेट व इतरांनी अशी उदाहरणे अभ्यासली होती. ह्या शतकात डॉ. मायकेल सबोम व शूनमेकरसारख्या वैद्यकविशारदांनी; एलिझाबेथ कुब्लर–रॉस व केनेथ रिंगसारख्या मनोवैद्यांनी मृत्युशय्येवरील व्यक्तींना आलेले अनुभव अभ्यासले आहेत. डॉ. कार्लिस ओसिस व डॉ. हराल्डस्सन यांनी अमेरिकेतील तसेच भारतातील शेकडो डॉक्टरांच्या व परिचारिकांच्या मुलाखती घेऊन आसन्नमरण व्यक्तींनी त्यांना सांगितलेले अनुभव संकलित केले आहेत. डॉ. पॉल गॅलप यांनी १९८२ मध्ये अमेरिकेत केलेल्या गणनेत (poll) असे दिसून आले की सुमारे वीस लक्ष व्यक्तींना मृत्युशय्येवर असतेवेळी देह सोडून दूर गेल्याचा अनुभव आला होता. मृत्युशय्येवरील व्यक्तींना आलेल्या अनुभवाचे स्वरूप सामान्येकरून असे :

'अंधकारमय प्रदेशातून (भुयारातून, गुहेतून वगैरे) गेलो (गेले); नंतर प्रकाशमय प्रदेश दिसला; तेथे दिवंगत आप्तेष्ट (व क्वचित संत-महात्मे) भेटले. आपल्याला नेण्यास दिवंगत नातेवाईक आले आहेत असेही काहींनी सांगितले आहे.[४]

**मृत्यू होऊन पुन्हा जिवंत** झाल्या अशा व्यक्ती आढळल्या आहेत. त्यांनी सांगितलेला दरम्यानचा अनुभव या संदर्भात उल्लेखनीय आहे. मृत्यू झाला असे डॉक्टरांनी निश्चित केले व काही मिनिटांनंतर शरीरात पुन्हा प्राण आला अशी उदाहरणे आहेत·

१९४३ साली डॉ. रिची हे प्राण गेल्यावर ९ मिनिटांनी पुनः जिवंत झाले. 'मी शरीराबाहेर गेलो व दुसरीकडे जाऊन आलो' असे त्यानी सांगितले. १९७४ साली एका मृताच्या देहात २३ मिनिटांनी पुनः प्राण आला. त्याने सांगितले : "मी असीम प्रकाशाकडे जात होतो. प्रकाशाच्या लहरी थंड होत्या. नंतर मी निराकार बनलो व दिक् व काल यांच्या अतीत गेलो." १९८१–८२ मध्ये २० वर्षे वयाचा ओवेन थॉमस सुरी-हल्ल्यास बळी पडला. छातीस मोठे छिद्र पडले व आतडीही बाहेर आली. डॉक्टरांच्या म्हणण्याप्रमाणे, हृदय ५ मिनिटे बंद पडले होते व रक्त आम्लयुक्त बनले होते. तो पुन्हा जिवंत झाल्यावर म्हणाला : "दोन वर्षांपूर्वी मोटर-अपघातात वारलेला माझा भाऊ क्रिस्तोफर भेटला. माझ्या खांद्यावर हात ठेवून त्याने म्हटले की 'आम्हाला तू इथे नको आहेस' व त्याने मला दूर लोटले." अशा प्रकारची १५० उदाहरणे डॉ. रेमंड मूडी यांनी अभ्यासली आहेत.[५] या सदरातील व्यक्तींचा अनुभव सामान्येकरून असा :

"गजरासारखा ध्वनी; अंधाऱ्या मार्गातून जलद गमन; नंतर धुके व मग प्रकाश; भौतिक देहाबाहेर असल्याची जाणीव; डॉक्टर वगैरे काय करीत आहेत हे दिसणे; भावनिक घालमेल, पण नंतर त्या विचित्र अवस्थेस सरावणे; निराळ्या प्रकारचे शरीर असल्याचे व त्याच्या ठायी निराळ्या क्षमता असल्याचे लक्षात येणे; मृत आप्तेष्ट भेटण्यास किंवा घेऊन जाण्यास आल्याचे दिसणे; कधी कधी पूर्वी कधीच न पाहिलेला तेजस्वी व प्रेमळ आत्मा दिसणे; गत आयुष्याचे मूल्यांकन कर म्हणून त्याने सांगणे; इहलोकातील जीवनाची सीमा ओलांडण्याची (–मृत्यूची) वेळ अजून आलेली नाही हे लक्षात येणे किंवा 'परत जा' म्हणून कोणी तरी सांगणे; या अनुभवामुळे, जीवनाकडे पाहाण्याची दृष्टी तसेच इतरांशी असलेले संबंध यांमध्ये सु-परिवर्तन घडून येणे."

देहविलगतेच्या अनुभवाच्या तपशिलांत जाता, काही अंशी एकवाक्यता व काही अंशी भिन्नता असल्याचे आढळले आहे. संवेदनांमध्ये स्पष्टता होती, विचारक्रिया व्यवस्थित चालू होती, जाणिवेची कक्षा विस्तार पावली होती, अभूतपूर्व अशी प्रसन्नता वाटत होती, अवर्णनीय असे मुक्तपण वाटत होते, वृक्ष, आकाश वगैरे कधी नव्हे इतके सुंदर वाटू लागले, सर्वच पालटून गेल्यागत वाटले, असे बहुतांशी व्यक्तींनी सांगितले आहे. तपशिलांत भिन्नता आढळली आहे ती अशी : 'देहापासून विलग' होतेवेळी शरीर थरथरले असे काही जणांनी सांगितले आहे. स्नायूंना आचके बसल्याचे काही जणांनी म्हटले आहे. विलग झाल्याचे जाणवण्यापूर्वी थोडा वेळ ज्ञानेंद्रिये बधीर व स्नायू अक्षम झाले असा काहीजणांचा अनुभव आहे. काहीजणांना, देहाबाहेर पडलेला 'मी' एक प्रकारच्या धाग्याने देहाशी जोडलेला दिसला. 'मी' मस्तकातून बाहेर पडलो असे काहींनी, तर नाभिस्थानातून बाहेर गेलो असे काहींनी सांगितले आहे. काहीजणांचा 'मी' हवेत तरंगला तर काहींचा 'मी' पक्ष्याप्रमाणे झेपावत गेला. काहींचा 'मी' भौतिक देहासंनिध होता, काहींचा खोलीच्या छताजवळ गेला होता, काहींचा 'मी' शरीराशेजारीच किंवा जराशा उंचीवर शरीराला समांतर स्थितीत होता. 'दुसऱ्या स्थळी गेलो व तेथील दृश्य अवलोकन केले' असे काहींनी सांगितले आहे. काही जणांना आपण प्रकाशाचा बिंदू आहोत किंवा प्रकाशाचा गोल आहोत असे वाटले, काहींना धुक्याचा मेघ आहोत असे जाणवले, तर काही जणांना स्वतःला शरीर आहे अशी जाणीव झाली. काही व्यक्तींनी त्यांना घंटेचा नाद, वाऱ्यासारखा सूं सूं आवाज, पंखांच्या फडफडीसारखा आवाज वगैरेंचा अनुभव आल्याचे सांगितले आहे.

देहविलगतेच्या अनुभवाचा **व्यक्तित्वाशी** काही संबंध असतो काय, या प्रश्नास अनुलक्षून केलेल्या अभ्यासांच्या आधारे हर्विन[६] यांनी म्हटले आहे, की ज्या व्यक्ती एखाद्या गोष्टीत पूर्णपणे तल्लीन होऊ शकतात, ज्यांचे अवधान शरीरामुळे विचलित होत नाही, ज्यांना सभोवतालच्या गोष्टीतून लक्ष काढून घेता येते, त्यांना हा अनुभव येऊ शकतो. अर्थात तन्मय होण्याची गरज भासली पाहिजे, तन्मयता पावण्याची प्रबळ इच्छा असली पाहिजे व जाणीव वा चेतना विस्तार पावावी, अशी तीव्र इच्छा असली पाहिजे. कोणास तरी भेटण्याची, किंवा एखाद्या ग्रहावरची वस्तुस्थिती जाणून घेण्याची वगैरे इच्छा असली पाहिजे.

**व्यक्तित्वाशी संबंध**

कल्पनाविहारप्रवण व्यक्तित्व व देहविलगतेचा अनुभव यांचा संबंध असावा असे श्रीमती हिल्गार्ड यांना वाटते.[७]

डॉ. स्टॅनफोर्ड यांनी या प्रश्नाचा अधिक खोलवर अभ्यास नुकताच केला आहे.[८] ज्यांनी स्वतःला निदान एकदा तरी देहविलगतेचा अनुभव आल्याचे सांगितले असे ४७ विद्यार्थी-विद्यार्थिनी प्रयोगासाठी घेतल्या. आपण हिरव्यागार मैदानावरील फुग्यात चढलो आहोत, विविध प्रदेशांवरून जात आहोत, मग खाली उतरत आहोत अशी कल्पना करा म्हणून त्यांना सांगितले. नंतर प्रश्नावली देऊन त्यांना विचारले की, कोणती दृश्ये बघितली ? कोणकोणती संवेदने अनुभवली ? खाली येतेवेळी काय अनुभव आला ? फुग्यात चढल्यापासून तो परत खाली उतरेपर्यंत किती काळ गेला असे वाटले ? प्रश्नावली भरून झाल्यानंतर, त्या ४७ जणांना त्यांच्या १२ वर्षे वयापर्यंतची माहिती विचारली व ती माहिती व त्या वयातील त्यांचे जीवन व व्यक्तित्व यांमध्ये किती सहसंबंधन (Co-relation) आढळते ते पाहिले. तेंव्हा असे दिसून आले की त्यांपैकी पुष्कळजण लहानपणी एकट्यानेच बाहुलीशी खेळण्यात, कथावाचनात, स्वतः स्वतःशीच खेळण्यात तल्लीन होत असत. त्याची कारणे विविध होती; उदा. घरातील कडक शिस्त, आईवडिलांनी दिलेला मार, सवंगडी न लाभणे, बरोबरीच्या मुलांत मिसळण्याच्या प्रवृत्तीचाच अभाव, इत्यादी. या प्रयोगाच्या आधारे तर्क करण्यात आला आहे, की ज्यांनी लहानपणी एकटेपणाने वेळ घालवला अशांना देहविलगतेचा अनुभव येण्याची शक्यता असते. मात्र, अशा सर्वांनाच तो येतो असा त्याचा अर्थ नव्हे, आणि ज्यांना तो येतो त्या सर्वांचेच बालपण त्या प्रकारे गेलेले असते असाही त्याचा अर्थ नव्हे.

**स्वरूपविषयक मीमांसा**

हा अनुभव का बरे येत असेल ? त्या वेळी कोणती प्रक्रिया घडून येत असेल ? जे भिन्नभिन्न घटक त्या अनुभवात अंतर्भूत असू शकतात त्यांना काही 'अर्थ', त्यांचे काही 'प्रयोजन' असेल काय ? या प्रश्नांना अनुसरून भिन्नभिन्न अभ्यासकांनी भिन्नभिन्न तर्क प्रस्तुत केले आहेत. एक तर्क असा : माणसाची स्वतःविषयी

जी कल्पना असते तिच्यात देहविषयक कल्पनेचा ( body-concept ) अंतर्भाव असतो व ती देह-विषयक कल्पना शरीरांतर्गत व्यापारांवर व विशेषतः स्नायुमूलक संवेदनांवर अधिष्ठित असते. जेव्हा त्या देहकल्पनेत काही कारणाने ( उदा., पक्षाघातामुळे ) बदल होतो, तेव्हा माणसाच्या एकूण स्व-कल्पनेस ( self-concept ) धोका निर्माण होतो, माणूस आतून अस्वस्थ होतो, सचिंत होतो व स्व-कल्पना सावरून धरली जाईल अशा स्वरूपाच्या प्रक्रिया सुरू होतात. 'स्वतःच्या शरीराहून वेगळे आहोत' असे वाटू लागणे ही अशीच एक प्रक्रिया असावी, असा प्रो. जॉन पामर यांचा तर्क आहे.

देहाबाहेर पडतेवेळी शरीर कापत होते, व 'मी' भौतिक शरीराशी ( प्रकाशमय ) धाग्याने जोडलेला होतो' या जाणिवेचा संबंध काहीजणांनी गर्भाशयातून बाहेर पडणाऱ्या अर्भकाचा कंप व अर्भकाची नाळ यांच्याशी लावला आहे. 'अंधकारमय प्रदेशातून जाऊन मग प्रकाशमान प्रदेशात गेलो' असे अनेक आसन्नमरण व्यक्ती सांगतात त्याचा संबंध मातेच्या योनिमार्गातून बाहेरच्या प्रकाशात येतानाच्या अर्भकाच्या अनुभवाशी असावा असा एक तर्क लढविण्यात आला आहे. (परंतु योनिमार्गे नव्हे तर सीझारिअन शस्त्रक्रियेद्वारा जन्मास आलेल्यांनाही तसा अनुभव आलेला आहे, असे डॉक्टर मंडळींनी दाखवून दिले आहे. )

मला वेगळ्या स्वरूपाचे, (उदा. अॅस्ट्रल–) शरीर असल्याचा अनुभव आल्याचे काहीजण सांगतात. त्याविषयी काही अभ्यासकांनी पुढीलप्रमाणे तर्क केला आहे. 'मी' हा शरीराच्या आत आहे अशी माणसाची एरवीची कल्पना असते. शरीराची अत्यंत शिथिल अवस्था, शरीरांतर्गत संवेदनांची अत्यल्पता, इ. मुळे ती बदलली की 'मी' तरंगत आहे असे वाटू लागते, त्याला अॅस्ट्रल शरीराच्या कल्पनेची जोड मिळण्याचा संभव असतो व 'त्या' शरीराच्या स्वरूपाविषयी काही-एक कल्पनाचित्र तयार होण्याची शक्यता असते.

मनोविश्लेषणाशी संबद्ध संकल्पना घेऊन काही तर्क लढविण्यात आलेले आहेत. जिवाला धोका निर्माण होतो अशा वेळी माणसाची मरणावर मात करण्याची मनीषा देहविलगतेच्या अनुभवास कारणीभूत होत असावी असे डॉ. एऱ्हेनवालना वाटते. ज्या वेळी 'मी पुरेसा सक्षम (competent) नाही' असे माणसाला वाटू लागते त्या वेळी त्याची स्व-कल्पना डगमगू लागते व म्हणून, '**मी** तर शरीराहून वेगळा आहे, अ-मर आहे' असे वाटावयास लावणारा, अर्थात देहविलगतेचा अनुभव येत असावा, असे डॉ. बार्बारा हॅनिंगर यांना वाटते. डॉ. गॅबर्ड व ट्वेमलो यांचा तर्क असा, की एरवी संयुक्तपणे असलेले शारीरिक 'अहम्' व मानसिक 'अहम्' हे एकमेकांपासून विलग होत असावेत (uncoupling).[९]

## देहविलगता—अनुभव व अतींद्रिय ज्ञान

माध्यमांच्या तंद्रावस्थेत, त्याचप्रमाणे ध्यानावस्थेत अतींद्रिय रीत्या ज्ञान झाल्याची उदाहरणे आहेत. देहाबाहेर असल्याचा अनुभव हीदेखील बदललेली जाणिवेची अवस्था (altered state of consciousness) असते. तीदेखील अतींद्रिय ज्ञानास अनुकूल ठरते असे काही उदाहरणे दर्शवितात.

श्री. आर. नारायणन् हे भारतीय सेवेतील अधिकारी जोराने आपटल्याने बेशुद्ध झाले होते. त्या वेळचा त्यांचा अनुभव असा : "मला एका खोलीत नेले आहे. तेथे झेनिथ घड्याळ व त्याखाली कॅलेंडर आहे. दिवा लागलेला आहे. आज १८ डिसेंबर, असे कोणी तरी म्हणाले. माझ्यावर जे डॉक्टर शस्त्रक्रिया करणार होते ते मृत्यू पावल्याचे मला दिसले. शुद्धीवर आल्यावर मी त्याना म्हणालो, "आज रात्री हृदयाच्या झटक्याने तुम्ही जाणार. तुमच्या पत्नीचे नाव कमला आहे काय व तुमच्या खोलीत झेनिथ घड्याळ व त्याच्या खाली कॅलेंडर आहे काय ?" डॉक्टर 'हो' म्हणाले. त्याच मध्यरात्री डॉक्टरांना हृदयाचा झटका येऊन ते वारले." ( इंडिअन एक्स्प्रेस, ९–१२–८३ ).

लेखक, कलावंत व संशोधक असलेल्या इंगो स्वान यांनी प्रसिद्ध केले आहे, की "१९७३–७४ मध्ये, मी देहातून बाहेर पडून गुरू व बुध ह्या ग्रहांवर गेलो" तेथे कायकाय दिसले तेही त्यांनी सांगितले. त्यानंतर काही दिवसांनी पायोनिअर-१० कडून आलेली माहिती तसेच १९७४ मध्ये मरिनर- १० कडून आलेली माहिती इंगो स्वानच्या निवेदनाशी जुळली.[१०] अर्थात, स्वान अतींद्रिय प्रत्यक्ष झाले की ते सूक्ष्म स्वरूपात खरोखरच ग्रहांवर गेले, हा प्रश्न उपस्थित करता येतो. असाच प्रश्न डॉ. प. वि. वर्तक ( पुणे ) यांच्या निवेदनात मी उपस्थित केला होता. मंगळ ग्रहावर, ध्यानावस्थेत, 'जाण्याचा' एक प्रयोग त्यांनी १०–८–७५






रोजी केला. तेथे पाणी नसल्याचे त्यांनी पाहिले व वातावरण अतिशय गार असल्याचे अनुभवले. त्यांचा अनुभव त्यांनी २५–४–७६ रोजी प्रसिद्ध केला. नंतर, २१–७–७६ रोजी व्हायकिंग–१ मंगळावर पोचले व NASA ने प्रसिद्ध केलेल्या माहितीद्वारा वर्तकांच्या निवेदनास पुष्टी मिळाली. त्यांनी तसाच दुसरा प्रयोग १२–८–७६ रोजी केला व २२–८–७६ रोजी प्रसिद्ध केले की, व्हायकिंग– २ हे व्हायकिंग–१ च्या जवळ जात असल्याचे व जोडले जाण्याच्या ( docking ) बेतात होते. पुढे ता. ७–९–७७ या दिवशी व्हायकिंग–२ पहिल्या यानाच्या कक्षेत (orbit) आले असे वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले. गुरु ग्रहाजवळ जाण्याचाही प्रयोग डॉ. वर्तकांनी २७–८–७७ रोजी केला व गुरुभोवती भ्रमण करणारे काही चंद्र त्यांनी पाहिले; असे २१–१०–७७ रोजी प्रसिद्ध केले. २१ डिसेंबर १९७८, ३ मार्च १९७९ व ९ मार्च १९७९ रोजी वृत्तपत्रांत आलेले वृत्त व गुरूच्या चंद्राची छायाचित्रे यांनी वर्तकांच्या निवेदनास पुष्टी मिळाली.

आता, ज्या दिवशी डॉ. वर्तकांना मंगळावर दुसरे यान पहिल्या यानाजवळ जात असल्याचे वगैरे दिसले त्या दिवशी ते यान मंगळाकडे प्रवास करीत होते, पोचलेले नव्हते. त्यामुळे एक तर वर्तकांना दिसलेले दृश्य पूर्वज्ञानमूलक ( precognitive ) असेल; अथवा, व्हायकिंग–२ पोचल्यावर ती याने एकमेकांजवळ येतील ही कल्पना वा अपेक्षा त्या दृश्याच्या मुळाशी असू शकेल. त्यांना दिसलेल्या इतर वस्तुस्थिती अतींद्रियप्रत्यक्ष या सदरात टाकणे शक्य आहे. मंगळावरील ‘ अनुभवलेल्या ’ थंडीचे मूळ त्या वेळच्या त्यांच्या त्वचासंवेदनाशी असू शकेल.

या विवेचनाच्या संदर्भात श्रीमती ब्लॅकमोर यांचे पुढील विचार लक्षात घेण्याजोगे आहेत : “ देहविलगतेच्या अनुभवादरम्यान काही जणांना त्या त्या स्थळाविषयींचे अतींद्रिय ज्ञान होते, परंतु त्या ज्ञानात काहीशी स्मृतीची व काहीशी कल्पनांची भर पडून एक तऱ्हेचा नकाशा ( cognitive map ) तयार होत असावा, व ‘ मी त्या ठिकाणी गेलो होतो ’ असे वाटत असेल. या अर्थाने ते जागृतीतील स्वप्न म्हणता येईल.[११]

## मरणोत्तर अस्तित्वाच्या संदर्भात

ज्ञानक्षम व कृतिक्षम असे काही सूक्ष्मतम अशा द्रव्याच्या आश्रयाने का होईना, देहाबाहेर जात असण्याची शक्यता दर्शविणारा पुरावा मिळाला, तर तो मरणोत्तर अस्तित्वाच्या **शक्यतेचा** पुरावा होऊ शकेल. असे ‘ काही तरी ’ सूक्ष्मशरीरसंज्ञक काहीतरी–प्राणोत्क्रमण होते त्या वेळी देह सोडून जाते, ही कल्पना प्राचीन कालापासून भारतात, इजिप्तमध्ये आणि खाल्डिअन संस्कृतीत आहे. पाश्चिमात्य तत्त्वचिंतक म्हणू लागले आहेत की ती कल्पना भ्रामक होय असे म्हणणे अविचारीपणाचे होईल.

या संदर्भात स्वतः व्यक्तीचे अनुभव, दुसऱ्या व्यक्तीच्या दृष्टीस पडलेले प्रकार, करून पाहण्यात आलेले विविध प्रयोग या सर्वांचा विचार करावयास हवा.

एक आसन्नमरण मुलगी तिच्या वडिलांना म्हणाली : “ बाबा, मी ‘ त्या ’ ठिकाणी गेले व तेथे मला माझा भाऊ भेटला. पण, बाबा, मला तर भाऊ नव्हता ! ” हे ऐकून वडिलांना रडू आले व त्यांनी तिला सांगितले: “ बाळे, तुला भाऊ होता पण तो तू जन्मण्यापूर्वी तीन महिने आधी वारला. ” एलिझबेथ कुब्लर-रॉस यांच्या संग्रहातील हे उदाहरण विचार करावयास लावणारे आहे.

“ रात्रीच्या वेळी मी ( गुलाबराव ) महाराजांना मायर्सच्या पुस्तकातून मजकूर सांगत असे. एके रात्री, मला वाटले की पाठीमागच्या बाजूस माझ्या खांद्यावरून कोणीतरी पुस्तकाकडे पाहते आहे. हा अनुभव मी महाराजांना सांगितला. ते काहीच बोलले नाहीत. दुसऱ्या रात्री, मी वाचतावाचता, आजूबाजूस लक्ष देत राहिलो. आदल्या रात्रीप्रमाणेच अनुभव आला, व मग, काही एक आकृती महाराजांच्या शरीरात प्रवेश करीत असल्याचे दिसले. हा अनुभव महाराजांना सांगितला. ते म्हणाले : ‘ आता लक्षात आले ना ? ’ ”[१२]

एका मानसशास्त्रज्ञाची पत्नी नियमितपणे ध्यान करीत असे. एकदा तिला आलेला अनुभव व जवळच्या कोचावर बसलेल्या शंकाखोर पतीला दिसलेला प्रकार प्रो. मायकेल ग्रॉस्योंनी प्रसिद्ध केला आहे. तिचा अनुभव असा : “ मी अंधुक प्रकाश असलेल्या खोलीत जमिनीवर आसन घालून बसले होते. चित्त अंगठीवर एकाग्र करून तिचा रंग, स्पर्श, इ. मनापुढे आणीत होते. पायांत व घोट्यात अस्वस्थता वाटू लागली पण मी ते हलवू शकले नाही. मग मला मन उन्नत झाल्यासारखे

जाणवू लागले. शरीराची जाणीव गेली. मी पूर्णतः मनाच्याच आवरणात आहेसे वाटू लागले. मग एकाएकी शरीराच्यावर जाऊन मी तेथून खाली पाहू लागले. माझे गुडघे, मांड्या, छाती व खांदे मी पाहिले."

तिचा हा अनुभव म्हणजे तिला 'तसे वाटणे' नव्हते. त्यात वास्तवाचा भाग होता. कारण, तिच्याकडे पाहात असलेल्या तिच्या शंकेखोर पतीने लिहिले आहे :

"पत्नीचा चेहरा लांबट होत चाललेला दिसला. नंतर वाफेसारखा पदार्थ वर जात असल्याचे व तिच्या चेहऱ्याचा व खांद्यांचा आकार घेत असल्याचे मी पाहिले. मी स्तंभित झालो. तो पदार्थ वरवर जाऊ लागला. तो व तिच्या मानेची मागील बाजू यांना जोडणारा दोरी-सारखा प्रकाशमान पदार्थ असल्याचे मी पाहिले. १५–२० सेकंदांत हा सर्व प्रकार घडला, पण मी चांगलाच घाबरलो." आता पाहाणाऱ्यास दृष्टिभ्रम झाला असण्याचा संभव असतो. कॅमेऱ्याच्या बाबतीत तो प्रश्न उद्भवत नाही.

गेल्या शतकातील एक प्रयोग खास महत्त्वाचा आहे; कारण त्यात **कॅमेऱ्याचा उपयोग** केलेला होता. बुखारेस्ट येथील शिक्षणसंचालक श्री. हॅस्डेन व त्यांचे स्नेही डॉ. इसराती यांनी प्रयोगासाठीची रात्र ठरवून घेतली होती. त्या रात्री ते दोघे आपापल्या गावी होते. श्री. हॅस्डेननी उशाशी एक व पायथ्याशी एक असे दोन कॅमेरे लावून ठेवले, इसरातींना मनोमन पाचारण केले व मग झोपी गेले. तिकडे इसरातींनी **दृढ संकल्प** केला की हॅस्डेनच्या कॅमेऱ्यावर स्वतःचे चित्र उमटवायचे. मग ते झोपी गेले. दुसरे दिवशी सकाळी कॅमेऱ्यातील काचा धुतल्या. एका काचेवर डॉ. इसरातींचे तंतोतंत प्रोफाइल आले होते. दुसरी काच, तीन वेळा प्रयत्न झाल्याचे दर्शवीत होती.[१३]

## अलीकडील प्रयोग

सुव्यवस्थित आखणी व योजनापूर्वक प्रयोग करून पाहावे हा सर्वोत्तम मार्ग होय. 'देहाबाहेर पडून अन्य स्थळी जाऊन आलो व येऊ शकतो' असे सांगणाऱ्या व्यक्तीस विशिष्ट लक्ष्यस्थळी (target location) नियोजित वेळी भेट देण्यास व तेथील वस्तुस्थिती अवलोकन करण्यास सांगणे; शक्यतो त्या ठिकाणी गेल्याचा पुरावा म्हणून काहीतरी कृती करण्यास सांगणे; त्या लक्ष्य-स्थळी निरीक्षक म्हणून कोणी ठेवावयाचे; मांजर, उंदीर, यांसारखा प्राणीही ठेवावयाचा; काही विशेष घडले तर त्याची नोंद करणारी उपकरणेही सज्ज ठेवावयाची, अशी योजना आखून प्रयोग करावयास हवेत. अशा प्रयोगांसाठी आपल्याकडे अजून तरी कोणी सहकार्य दिले नाही, ही खेदाची गोष्ट होय. अमेरिकेत मात्र काही व्यक्तींचा सहयोग प्राप्त झाला आहे.

इंगो स्वान यांच्यावरील आठ प्रयोगांच्या मालिकेत त्यांच्यापासून १० फूट उंचीवरील फळीवर एका वेळेस एक स्वैर पद्धतीने निवडलेली वस्तू ठेवली होती. स्वान यांनी बसल्या जागेवरून आठही वेळा तिचे बरोबर वर्णन दिले. विशेष असे की, काही वस्तू त्यांना उफराट्या दिसल्या होत्या. काही वेळा फळीवर चकचकीत प्रकाश पडलेला होता व म्हणून वस्तूचा काही भागच दिसल्याचे त्यांनी सांगितले.

दुसऱ्या एका प्रयोगात स्वान यांनी देहापासून विलग होऊन न्यूयॉर्क येथून डरहॅम येथे श्री. सॉल्फविन व स्टुअर्ट हरारी यांच्या प्रयोगशाळेत, नियोजित वेळी जाण्याचा प्रयत्न लागोपाठ दोन रात्री केला. त्या प्रयोग-शाळेत ४ कॅसेटचा एक संच असे ५ संच घेतलेले होते, व प्रत्येक कॅसेटवर घंटा, भोंगा, तंतुवाद्य वगैरेंपैकी कोणता तरी एक आवाज होता कोणती तरी कॅसेट प्रयोगाच्या रात्री लावली गेली. स्वान यांनी त्या ठिकाणी गेल्यावर कोणता ध्वनी ऐकू आला व तेथे कोणी दिसले की नाही हे (न्यूयॉर्क येथे) टिपून ठेवले. नंतर त्या चारही टेपवरचे ध्वनी एका मास्टर टेपवर घेऊन तो टेप न्यूयॉर्क येथे स्वान यांना ऐकविला व त्या दोन रात्री त्यांपैकी कोणते दोन ध्वनी ऐकले व त्या ठिकाणी कोणी होते की नाही हे त्यांनी टपालाने डॅरहॅम येथे कळविले. त्यांचे निवेदन वस्तुस्थितीबरहुकूम असल्याचे आढळले.

स्टुअर्ट ब्लू हरारी यांनी स्वतः काही प्रयोगांत प्रयुक्त म्हणून भाग घेतला. ५० फूट ते पाव मैल दूर असलेल्या लक्ष्य-स्थळी दोनतीन निरीक्षक टेपरेकॉर्डर घेऊन बसवले होते, काही प्राणी व नोंदउपकरणेही होती. अमुक ४० मिनिटांच्या अवधीत **केव्हा तरी** हरारी तेथे येण्याचा प्रयत्न करतील इतकेच निरी-क्षकांना सांगून ठेवले होते. इकडे हरारींना सांगण्यात आले की त्या ४० मिनिटांच्या अवधीत **अमुक** १० मिनिटांत लक्ष्य-स्थळास २–३ मिनिटे भेट द्यावयाची,








दुसरी भेट नंतरच्या १० मिनिटांत द्यावयाची व त्यानंतरच्या दहा मिनिटांत तिसरी भेट द्यावयाची.

प्रयोगाच्या दिवशी हरारी दुपारी खात नसत; शिथिल व शांत अवस्थेत राहात; हृदयस्पंदन व श्वासोच्छ्वास यांची गती मंद ठेवीत, व देहाबाहेर जाण्याच्या तयारीत राहात.

एका प्रयोगाच्या वेळी, त्यांचे आवडते मांजराचे पिलू लक्ष्य-स्थळी, कोपऱ्यात, ८० × ३० × १० इंच आकाराच्या खोक्यात ठेवले होते. कारण त्यांची धारणा होती की आपण तेथे गेलो असल्याची केवळ कल्पना केली तर त्या वेळीच्या पिलाच्या हालचाली आणि देहाबाहेर पडून खरोखरच गेल्यावेळीच्या पिलाच्या हालचाली यांमध्ये तफावत आढळेल.

प्रयोगकर्त्यांनी हरारींना आठ वेळा संभाषणात गुंतवून ठेवले व आठ वेळा लक्ष्य-स्थळी 'जाण्यास' सांगितले. संभाषणांच्या एकूण कालावधीत पिलू अस्वस्थ होते व ३७ वेळा म्याव् म्याव् झाली होती. (पिलाला भेट दिली) त्या एकूण आठ भेटी मिळूनच्या कालावधीत ते शांत होते व त्याने एकदासुद्धा म्याव् केले नव्हते. एका प्रयोगाच्या वेळी ज्या जागी मी उभा होतो म्हणून हरारींनी सांगितले, त्याच बाजूस पिलू बराच वेळ बसले होते.

डॉ. तनाऊस यांनी प्रयुक्त या नात्याने डॉ. कार्लिस ओसिस (न्यूयॉर्क) यांच्या प्रयोगात भाग घेतला. लक्ष्य-स्थळी मेजावर एक वस्तू ठेवलेली होती. तिच्या आजूबाजूस आरसे व तिच्या पुढ्यात लोलक (प्रिझम) ठेवला होता. या सर्वांच्या पुढे एक छिद्र असलेली फळी ठेवली होती. त्या छिद्रातून पाहणाऱ्याला ती वस्तू निरनिराळ्या जागी दिसेल किंवा तिची प्रतिबिंबे एकमेकांवर पडतील, किंवा त्या प्रतिमांचा विशिष्ट भागच दिसेल, अशी ही व्यवस्था होती. दुसरी एक प्रयुक्तीही योजलेली होती ती अशी : एका मेजावर ठेवलेल्या छिद्रयुक्त फळीच्या पलीकडे एक वर्तुळाकार चकती ठेवली होती. शेजारच्या खोलीतून बटन दाबले की ती फिरू लागे व पांचपैकी कोणत्या तरी एका रंगाची पार्श्वभूमी निर्माण होई. त्या छिद्रातून पाहणाऱ्यास चकतीच्या अमुक (क्वाड्रंट) वर विशिष्ट रेखाचित्र असल्याचा दृक्भ्रम होई. त्या ठिकाणी दीडफुटी पेटीही टांगलेली होती. ती पोलादी पत्र्याच्या दुहेरी वेष्टनात होती. त्यामुळे विद्युतचुंबकीय प्रवाहापासून संरक्षित होती. तिच्या आत दोन कंपन-ग्राहक पत्रे (sensors) टांगलेले होते व त्यांना स्ट्रेन गॉजेस (प्रतिविकृतिमापक) जोडलेले होते. पत्रे कंप पावले की स्ट्रेन गॉजेसमध्ये विद्युतप्रवाह निर्माण होई व तो वर्धित होई. त्याची नोंद शेजारच्या खोलीत होई.

डॉ. तनाऊस काळोख्या व नि:शब्द खोलीत शिथिल अवस्थेत पडून राहात, किंवा ध्यान लावीत. लक्ष्य-स्थळी जाण्याच्या तयारीत असल्याचे त्यांनी इंटरकॉम-वरून सांगितले की शेजारच्या खोलीत बटन दाबले जाई व ती चकती फिरू लागे.

या दुसऱ्या व्यवस्थेनुसार १४७ प्रयोग झाले. ११४ वेळा, पार्श्वभूमीचा रंग, अथवा दिसलेले रेखाचित्र डॉ. तमाऊसनी बरोबर सांगितले. यावरून, त्या छिद्रातूनच पाहण्याचे प्रयत्न त्यांनी केले होते, असा निष्कर्ष काढण्यात आला. डॉ. तनाऊस देहविलग होऊन खरोखरच तेथे गेले होते या निष्कर्षास त्यांनी निवेदन केलेले काही अनुभव दुजोरा देणारे आहेत. एका प्रयोगानंतर त्यांनी सांगितले की लक्ष्य-स्थळी एक बाई बसलेल्या होत्या. ती गोष्ट खरी होती. एका प्रयोगाच्या वेळी ते मध्येच ओरडले : "अहो, तो प्रकाश फारच तीव्र आहे अन् मला दिसेनासे झाले आहे." त्या वेळी लक्ष्य-स्थळी बिघाड झालेला होता व तेथील वस्तूंवरचा प्रकाश खरोखरच तीव्र झालेला होता. डॉ. तनाऊसनी असेही सांगितले की, "माझे ते दुसरे शरीर माझ्या भौतिक देहापेक्षा बुटके वाटे व मेजावरील पेटीच्या छिद्रातून पाहता येण्यासाठी मला ते शरीर ताणावे लागे."

एका स्त्रीने अमुक वेळेस लक्ष्य-स्थळी जावयाचे असे ठरले होते. तेथे निरीक्षक म्हणून बसवलेल्या महिलेस "काही तरी दिसले" असे वाटून तिने कॅमेरा सुरू केला. थोड्याच वेळात डॉ. ओसिसना त्या प्रयुक्त स्त्रीने फोन करून कुरकूर केली की : "मी तुमच्या ऑफिसात 'आले' असताना माझ्यावर पटापट कॅमेरा चालवणे ही काय रीत झाली ?"

भौतिक देहातून खरेच काही बाहेर जाऊ शकत असेल तर ते तात्पुरता मूर्त देहही निर्माण करून घेत असेल, असा विचार काही वाचकांच्या मनात येईल. असे खरोखरीच घडत असेल, तर तो प्रकार द्वि-स्थळीय अस्तित्व (bilocation)– म्हणजे एकच व्यक्ती दोन ठिकाणी– या सदरात पडेल.

जिवंत व्यक्ती वस्तुतः एका स्थळी असताना ती दुसऱ्या स्थळीही दिसली या प्रकाराची काही उदाहरणे या संदर्भात मनात येण्याचा संभव आहे. एक वृत्तांत विशेष विचार करावयास लावणारा आहे.

'दादाजी' चौधरी १९७० साली अलाहाबादला एका गृहस्थांच्या घरी होते. एका खोलीत ते एकटेच बसले होते. दुसऱ्या खोलीत भक्तमंडळी भजन करीत होती. खोलीतून बाहेर आल्यावर ते एका स्त्रीस म्हणाले : कलकत्त्यास तुमच्या वहिनीस पत्र लिहा व मी पत्ता सांगतो त्या घरात या वेळी मी कोणास दिसलो काय ते विचारावयास सांगा. मुकर्जीनामक कुटुंबाचा पत्ता त्यांनी दिला. त्याप्रमाणे पत्र गेले. पत्रोत्तरी आलेला वृत्तांत असा :

"कु. रमा मुकर्जी स्वतःच्या झोपण्याच्या खोलीत पडल्यापडल्या इंग्रजीचा पाठ करीत असताना तिला आवाज ऐकू आला. दादाजी तिच्या अभ्यासिकेत असल्याचे तिला दारातून दिसले व ती किंचाळली. गप्प राहण्यास व चहा आणण्यास त्यांनी तिला खुणावले. तिने त्यांना चहा-बिस्किटे आणून दिली. तिच्या मागे तिच्या मातुश्री व डॉक्टरबंधू होते. दाराच्या फटीतून मातुश्रींनी दादाजींना बघितले. बाजार करून आलेल्या श्री. मुकर्जींनी साशंक नजरेने फटीतून पाहिले. खुर्चीवर माणूस बसलेला त्यांना दिसला. काही वेळाने त्या चौघांना आवाज ऐकू आला दुसऱ्या दाराने दादाजी गेले असावेत असे वाटून ते चौघे त्या खोलीत गेले. तेथे दादाजी नव्हते. दाराच्या खिट्या बंद होत्या अर्धा कप चहा व बिस्किटे नाहीशी झाली होती, मेजावर, दादाजींच्या आवडत्या सिगरेटचा तुकडा जळत होता." [१४]

मुकर्जीकुटुंबातील चार जणांना एकाच वेळी दिसलेले ते दृश्य दादाजींकडून झालेल्या विचार-संक्रमणाचा परिणाम, हे स्पष्टीकरण कितपत समाधानकारक ? हा प्रश्न मनात आल्यावाचून राहणार नाही.

द्विस्थळी देहरूपाने अस्तित्वाच्या संदर्भात आणखी मनात येतात ते गेल्या शतकात प्रसिद्ध झालेले दोन वृत्तांत. ते कसोशीपूर्वक निरीक्षणांवर आधारलेले होते की त्यांवर करणी व जादूटोणा यांवरील विश्वासाचा प्रभाव पडलेला होता हे समजण्यास मार्ग नाही. तथापि त्यांचा उल्लेख करून ठेवण्यास हरकत नसावी. (जर तशा प्रकारची उदाहरणे कोणास आढळत असतील तर त्यांची शहानिशा करता येईल व प्रयोगात्मक निरीक्षणही करता येईल.) एक प्रकार असा :

"एका रशियन अधिकाऱ्यास एका जिवंत माणसाचे 'भूत' वारंवार दिसत असे. एके दिवशी त्याने त्या भुताच्या मस्तकात तलवार खुपसली. तिकडे, त्या वेळी त्या माणसाच्या डोक्यास जखम होऊन दुसऱ्या दिवशी तो मरण पावला." [१५]

दुसरा वृत्तांत English Judicien Archives मध्ये आहे. "जेन ब्रुक्स नावाच्या (दुष्ट) बाईचा रोख एकदा एका लहान मुलाकडे वळला. मूल क्षीण व निस्तेज होत चालले. एके दिवशी त्याने भिंतीवरील एका जागेकडे बोट दाखवून म्हटले : 'जेन ब्रुक्स ती तिथे आहे.' तेव्हा एका माणसाने त्या जागेवर चाकू मारला. नंतर तिच्या घरी जाऊन पाहता तिच्या हातास जखम झालेली आढळली."

**परकायाप्रवेश** या कल्पनेत तथ्य असेल काय ? आद्य शंकराचार्यांनी परकायाप्रवेश केला होता, ज्ञानदेवांनी रेड्याच्या किंवा रेडेनामक अशिक्षिताच्या मुखी वेद वदविले, या आख्यायिकांमध्ये तथ्य असेल काय, हे प्रश्नही मनात येतात. त्यांचे उत्तर पुढील प्रकारचे उदाहरण आढळले तरच होकारार्थी देता येईल. जर कोणी व्यक्ती सांगू शकली, की अमूक वेळी मी देहाबाहेर जाईन व जर त्याच वेळी एखाद्या माणसाद्वारे तिच्या लकबी, भाषाज्ञान, व्यक्तित्वविशेष, इत्यादींनी युक्त असे काही आले, तर तो परकायाप्रवेशाचा (एकपरी जिवंत व्यक्तीच्या संचाराचा) प्रकार म्हणता येईल.

## संदर्भ व टीपा–

१. G. O. Gabbard & S. W. Twemlow, With The Eyes of the Mind (1984).
२. M. Sabom, Reflections of Death, (1982).
३. के. व्ही. बेलसरे, 'आनंद साधना', ५ वी आवृत्ती, १९८७.

४. कुंडलिनी उत्थापन होते त्या वेळचा अनुभव व मृत्यू नजीक आलेल्या अवस्थेत काही जणांना आलेला अनुभव यांमध्ये साम्य आढळले असे डॉ. केनेथ रिंग यांनी म्हटले आहे. श्वासोच्छ्वासाच्या स्वरूपात बदल; स्नायूंचे आचके; अनैच्छिक हालचाली; खाज, झिणझिण्या व कंप; शरीराच्या तपमानात बदल; शक्तीच्या पातळीत बदल; शरीराचा विस्तार / संकोच झाल्यासारखे वाटणे; प्रकाश दिसणे व ध्वनी ऐकू येणे; देहापासून वेगळे झाल्यासारखे वाटणे हे ते साम्य होय. (K. Ring, *Heading Towards Omega*, 1984.

५. R. Moody *Life After Life*, 1975.

६. H. J. Irwin, *Flight of Mind*, 1985.

७. अशा व्यक्ती विशेष प्रमाणात संमोहनक्षम असतात. J. R. Hilgard, *Personality and Hypnosis*, 1974.

८. Rex G. Stanford, in Jour. Parapsychology, June 1987.

९. G. O. Gabbard & S. W. Twemlow, *With The Eyes of The Mind*, 1984.

१०. Ingo Swann. To Kiss Earth Goodbye.

११. Susan J. Blackmore, Transpersonal Psychology, 1968.

१२. (कै.) प्राध्यापक धामापूरकरांच्या रोजनिशीतील उतारा.

१३. डॉ. इसरातींच्या मनाचा हा प्रभाव असेल, म्हणजेच हा Psychokinesis चा प्रकार असेल असे काही जण म्हणतील.

१४. K. Osis, Research In Parapsychology, 1982,

१५. Papus, Magic Practique.



# जी. ए. कुलकर्णी : डोहकाळिम्यात डोकावताना .... !

रा. ग. जाधव

मराठीतील एक श्रेष्ठ कथालेखक जी. ए. कुलकर्णी यांचे परवा निधन (११ डिसेंबर १९८७) झाले. साहित्यविषयक प्रगल्भ अभिरुची असणारा वाचकांचा एक चाहतावर्ग जी. एं.ना लाभला होता. या वर्गाला एक प्रकारची खंत पहिल्यापासूनच जाणवत होती : आपला हा आवडता कथालेखक सभा-संमेलनांतून कधी दिसत नाही, त्याची छायाचित्रे कधी वृत्तपत्रांतून झळकत नाहीत, साहित्यविषयक मुलाखती किंवा प्रकट चिंतन किंवा काही निवेदने वा प्रकटने हा लेखक करीत नाही, या प्रकारची काहीशी रुखरुख जी. एं. च्या रसिकवर्गाला सतत बोचत होती. जी. एं. च्या निधनाने त्यांच्या चाहत्यावर्गाची ही रुखरुख संपुष्टात आली आहे. प्रसिद्धीची माध्यमे आणि एकूणच रसिकसंपर्क जी. एं. नी जवळजवळ निषिद्धच मानला होता. त्यामागे त्यांची काही कारणे निश्चितच असली पाहिजेत, हे उघडच आहे. त्यासंबंधी काहीसे सूचक असे विचार त्यांच्या खाजगी पत्रव्यवहारातून आणि त्यांच्याविषयी प्रसिद्ध झालेल्या अत्यल्प लेखनातून दिसून येतात. लेखकाने लेखन करावे आणि वाचकाने ते वाचावे, याच्यापलीकडे लेखकाकडून काहीएक सामाजिक किंवा सांस्कृतिक भूमिका अपेक्षित करणे आवश्यक नाही, असा बहुधा जी. एं. चा विचार असावा, असे दिसते. रसिकसंपर्क ही लेखकाच्या व्यक्तिगत निवडीची बाब आहे; केवळ लेखन करणे याचाच अर्थ रसिकसंपर्क, अशी काहीशी जी. एं. ची भूमिका असावी. केशवसुतांनी आपल्या दुर्मुखल्या चेहऱ्याचा निर्देश करून प्रत्यक्ष रसिकसंपर्काच्या वैय्यर्थ्यावर नेमके बोट ठेवले होते. एक प्रकारे जी. एं. सारखीच भूमिका घेतली होती. आपल्या दुर्मुखल्या मुखामधून बाहेर पडणारी वचने "तुम्ही नाही तरी तुमची मुले ओठावर खेळवतील आणि त्या वेळी– "कोणीही पुसणार नाही कवि तो होता कसा आननी", असे केशवसुतांनी म्हटले आहे. जी. एं. च्या चेहऱ्याबद्दल दुर्मुखलेपणाचा आक्षेप कोणीही घेतलेला नाही. आणि चांगला रसिकवर्ग आपणास लाभला नाही, अशी तक्रार करावयासही त्यांना जागा नव्हती. कदाचित धारवाडसारख्या दूरच्या अमराठी शहरात प्रदीर्घकाळ वास्तव्य असल्यामुळे रसिकसंपर्काबद्दलची उदासीनता त्यांच्यात निर्माण झालेली असावी. रसिकसंपर्क आपल्या वाङ्मयीन संस्कृतीचा औपचारिक भाग असतो. तो भाग मला अभिप्रेत आहे. लेखकाने केवळ लेखनापुरतेच मर्यादित राहावे असे नाही, तर आपल्या निर्मितीच्या कोशाबाहेर पडून त्याने समाजात मिसळावे, समाजातील सर्वसामान्य माणसे आणि अभिरुचिसंपन्न रसिक या दोहोंना लेखकातील माणसाविषयी आणि माणसातील लेखकाविषयी जे कुतूहल असते, ते त्याने विविध प्रकारे समाजासमोर येऊन पूर्ण करावे; अशी आपल्या वाङ्मयीन संस्कृतीची एक अपेक्षा असते. काहीशी स्वाभाविक अशीच ही अपेक्षा म्हटली पाहिजे. आपल्या सामाजिक व्यवहारातही व्यक्ती ही अनेक प्रकारच्या भूमिका एकाच वेळी पार पाडीत असते आणि एकाच भूमिकेच्या अनेक सांकेतिक जबाबदाऱ्या निभावत असते. किंबहुना समाजात असणे हे समाजाशी अनेक प्रकारे नाते राखणे ठरते किंवा असते. लेखक हीदेखील सामाजिक म्हणा, सांस्कृतिक म्हणा, एक भूमिकाच आहे आणि या भूमिकेला काही प्रथा चिकटलेल्या आहेत. सामाजिक मूल्यही तिला आहे. तसे प्रत्येक भूमिकेलाच काही एक मूल्य समाजात असते. म्हणून भूमिका आणि तिच्यात अंतर्भूत असलेल्या प्रथा व मूल्य ही प्रत्येक व्यक्तीवर एक जबाबदारी नकळत टाकत असतात. लेखक म्हणून केवळ लेखन करणे आणि बाजूला होणे ही गोष्ट लेखकाच्या व्यक्तिगत स्वातंत्र्याचा हक्क म्हणून मान्य केली, तरीदेखील समाज आणि समाजातील रसिकवर्ग यांची याबद्दलची रुखरुख किंवा नाराजी आपण समजून घेतली पाहिजे. जी. एं. नी या दृष्टीने कधी विचार केला किंवा काय, हे कळण्यास मार्ग नाही. तसा तो त्यांनी कधी केला असता, तर कदाचित त्यांनी आपल्या चाहत्या










वर्गाची आमरण अशी औपचारिक निराशा केली नसती. ते अत्यंत मनस्वी वृत्तीचे होते हे खरेच ! त्यांच्या बाजूने बोलावयाचे तर असेही म्हणता येईल, की प्रत्येक लेखकाने आपल्या वाङ्मयक्षेत्रातील रूढ संकेत पाळलेच पाहिजेत असे नाही. आचारनियमांशी (नॉर्म्स) संगती राखणे (कन्फॉर्म) ही काही प्रत्येक लेखकाच्या बाबतीत अट अशी करता येणार नाही. एक व्यक्ती म्हणून त्या लेखकाला थोडेसे जगावेगळे जगावेसे वाटले, तर तेही समाजाने समजून घेतले पाहिजे. हे सर्व बरो-बरच आहे. जी. एं.ची रसिकसंपर्कशून्यतेची अशीही बाजू आपण लक्षात घेऊ शकतो. एकच प्रश्न हळूच मनात डोकावतो. तो म्हणजे, जी. एं. मधला लेखक आणि माणूस या दोन व्यक्तींचे परस्परसंबंध कसे होते ? अंतर्यामी अहोरात्र एकत्र असणाऱ्या या दोन व्यक्ती एकमेकांशी सुसंवाद राखून होत्या किंवा काय ? एकाच झाडावरील हे दोन पक्षी परस्परांना उद्देशून जे काही किलबिलत असतील, ते एकमेकांना खरोखरच समजत असेल काय ? लेखकातल्या माणसाच्या काही अपेक्षा, आकांक्षा असतात आणि माणसातील लेखकाच्या ठिकाणीही अशा आकांक्षा असू शकतात. वाङ्मयीन संस्कृती या दोहोंच्या आशा-अपेक्षांच्या विनिमयाची एक बैठक म्हणा, संधी म्हणा उपलब्ध करून देत असते. आणि एक प्रकारच्या क्रीडावृत्तीने किंवा लीलावृत्तीने व्यक्तीमधील या दोन भूमिकांनी एकमेकांच्या आशा-अपेक्षांना प्रतिसाद द्यावयाचा असतो, असे मला वाटते. माझ्या लेखनाचे कौतुक व्हावे, त्याची गुणग्राहक प्रशंसा कानी पडावी, वृत्तपत्रांतून किंवा नियतकालिकांतून आपली छायाचित्रे झळकावीत, पुरस्कार व पारितोषिके मिळावीत, सभा-संमेलने किंवा परिसंवादांतून चोखंदळ वाचकांच्या बरोबर चांगली चर्चा करण्याची संधी मिळावी, आपल्या खाजगी जीवनाचे नाते आपल्या लेखनात शोधू पाहणाऱ्या जिज्ञासू अभ्यासकांचे जमेल तेवढे समाधान करावे या किंवा यांसारख्या अपेक्षा उभयसापेक्ष म्हणजे लेखकातील माणसाच्या व माणसा-तील लेखकाच्या अशा दुहेरी असतात. यात गैर असे अर्थातच काही नाही. आपण माणसाची प्रतिष्ठा मान-णाऱ्या वातावरणात राहात आहोत. जी. एं. नी एवढ्या विविध प्रकारच्या व्यक्तींचे अंतःस्पंदन आपल्या कथांतून मुलायमपणे मुखरित केले. त्यांना स्वतःमधील माण-साच्या या आकांक्षाचे स्वर कधीच का ऐकू आले नाहीत ? मनस्वी म्हणण्यापेक्षा जी. ए. हे माणसाच्या माणूस म्हणून असणाऱ्या सर्वसामान्य आकांक्षांची दखल घेण्यास, खरे तर, मनापासून तयारच नव्हते, असे मला वाटते. एका अज्ञात आणि गूढ अशा नियतीच्या यंत्रणेत अगतिकपणे भिरभिरणारी भिरभिरे म्हणजेच आपण माणसे असेच त्यांना वाटत असावे. आपल्या कथांतील पात्रांना त्यांनी ज्या न्यायाने वागविले, त्याच न्यायाने त्यांनी आपल्यातील माणसाला वागविले. थोड्याशा कमी गंभीर अशा पातळीवर उतरून माण-साच्या सर्वसामान्य आशा-आकांक्षांची गोडी किंवा गोडवा आस्वादावा, असे त्यांना कधी वाटलेच नसावे. एक प्रकारच्या कठोर अशा नियतिशरण दृष्टिकोणातून त्यांनी आपल्या व्यक्तिगत आयुष्याची कथाही जगून दाखविली. 'सिनिक्ची कथा' असे तिला म्हणणे योग्य ठरेल काय ? इंग्रजीमध्ये 'पोएटिक जस्टिस' म्हणजे काव्यन्याय अशी एक संकल्पना आहे. त्याच धर्तीवर जी. एं. नी जणू 'कथान्याया'ची एक संकल्पना मराठी वाङ्मयीन संस्कृतीत निर्माण केली. आपल्या कथापात्रांना ज्या वाटेने त्यांनी मार्गस्थ केले, त्याच वाटेने कदाचित नकळत ते त्यांच्यातील माणूसही रखडत नेत होते. कदाचित हे म्हणणेही त्यांना कधी पटले नसते...

पण त्यामुळेच जी. एं नी त्यांच्या अभ्यासकां-समोर अनेक प्रश्न निर्माण करून ठेवले आहेत. साहित्यातील सामाजिकतेची एक समस्या अशाच प्रकारची आहे. जी. एं. नी ज्या काळात कथा-लेखन केले, त्या काळात म्हणजे साधारण १९५० --१९७० या वीस वर्षांत एकूणच मराठी साहित्यात सामाजिकतेचे भान कमी होते. अर्थात सामाजिकतेचे भान म्हणजे नेमके काय, हे सांगणे वरवर म्हटले तर सोपे वाटते, पण ते तेवढे सोपे नाही. माणदेशी माणसं किंवा गोखले-गाडगीळ यांच्या नवकथा किंवा पेंडसे-दांडेकरांच्या कादंबऱ्या यांत सामाजिक भान नव्हते, असे म्हणता येणार नाही. मर्ढेकरादी नवकवींच्या काव्यातही सामाजिकता नव्हती, असे म्हणता येणार नाही. एका विशिष्ट अर्थाने सामाजिकता प्रत्येक साहित्यकृतीत आणि प्रत्येक कालखंडातील साहित्यात असतेच. त्या काळात कथालेखन करणाऱ्या जी. एं. च्या निर्मितीत अगदी गारुड्यापासून राजाराणी-पर्यंत अनेक सामाजिक थरांतील व्यक्ती साकार झाल्या.

मात्र वाचकाला क्वचितच त्यांच्या कथांतील कथानकाची आणि पात्रांची सामाजिक बाजू महत्त्वाची म्हणून लक्षात घ्यावीशी वाटली. व्यक्ती, नियती आणि व्यक्ति-व्यक्तीसंबंध यांतील नाट्यातच वाचकांना खिळवून ठेवण्याचे सामर्थ्य जी. एं. च्या कथांतून प्रगट झाले. चालू दशकात जी. एं. सारखा लेखक निर्माण होईल का, असा एक कुतूहलजनक प्रश्न हळूच मनात डोकावून जातो. आज तर सामाजिकतेच्या भानाचे विशिष्ट अर्थ व अपेक्षा आपल्या वाङ्मयीन संस्कृतीत दुमदुमत आहेत. व्यक्तीचे मन आणि समूहमानस या दोहोंनाही परिवर्तनवादी सामाजिकतेने घेरले आहे. एखाद्या प्रतिभावंत लेखकाचा उदय हा कालस्वर आणि त्याचा व्यक्तिगत प्रतिभास्वर यांच्या संयोगातून होतो, असे आपण पुष्कळदा म्हणतो. साधारणपणे १९५० ते १९७० या दोन दशकांत असे काही चैतन्यविशेष होते किंवा काय, की ज्यांमुळे जी. एं. ची श्रेष्ठ कथा उदयास आली? – या प्रश्नाचे उत्तर देणे अर्थातच सोपे नाही. मराठी कथा–कादंबऱ्यांत सामाजिक आशय भरपूर आहे; परंतु मानवी जीवनाच्या मूलभूत समस्यांना मात्र त्यात क्वचितच स्पर्श केलेला असतो, असा एक आक्षेप घेण्यात येतो. मला वाटते, जी. एं. च्या कथांनी या आक्षेपाचे वैय्यर्थ्य पटवून दिले आहे. शेवटी मानवी मनाच्या मूलभूत समस्या म्हणजे तरी काय असते? मानवी मनाच्या मूलभूत जीवनसमस्या या व्यक्तिजीवनाच्या असतात. व्यक्ती आपल्या सुखदुःखांचा अर्थ कसा लावते, आपल्या यशापयशांची मीमांसा कशी करते, आपल्या जगण्या-मरण्याचा कोणता बोध करून घेते, याच्याशी जीवनाच्या मूलभूत समस्या निगडित असतात आणि बहुधा सामाजिक समस्यांच्या पृष्ठभागाखाली या अशा मूलभूत समस्या दडलेल्या असतात. नवकथेत सगळेच बेताचे होते. सामाजिक समस्या काय किंवा मूलभूत समस्या काय, या दोहोंनाही पृष्ठभागावरच खेळविलेले होते. खरे तर, ही कथा पुढे एका कुंठित अवस्थेत कोंडीतच सापडल्यासारखी झाली होती. जी. एं. च्या कथांनी ही कोंडी फोडली आणि निर्विवादपणे मराठी कथेला जीवनाच्या मूलभूत समस्यांच्या दिशेने मार्गस्थ केले. पण ही प्रेरणा त्यांना कशी मिळाली? एकोणिसशे सत्तरीच्या दशकात येऊ घातलेले विशिष्ट सामाजिक भान आणि पन्नाशीनंतर प्रभावी ठरलेली अस्तित्ववादी भूमिका या दोहोंच्या मधल्या काळात जी. एं. ची कथा उदयास आली. १९५० नंतरची वीस वर्षे आपण खरोखरच जीवनाचे मूलभूत प्रश्न समजावून घेत होतो किंवा काय? व्यक्ती-व्यक्ती, व्यक्ती-नियती यांच्यातील गूढ-करुण अशा संबंधांचे भान समाजात निर्माण झाले होते काय? त्या दोन दशकांतील व्यक्तिमानस व समूहमानस नेमक्या कोणत्या समस्यांशी झगडत होते? आणि ज्या समस्यांशी ते झगडत होते, त्या समस्या आणि जी. एं. च्या कथांतील आशय यांच्यात नेमके नाते कशा प्रकारचे होते? हे प्रश्न उपस्थित करणे म्हणजे पुन्हा एकदा प्रतिभा आणि परिस्थिती यांच्यातील नात्याच्या मृगजळाचा अपरिहार्य असा पाठलाग करण्यासारखे आहे. प्रतिभाशक्ती ही ज्या रूपांतून आविष्कृत होते, ती रूपे जास्तीत जास्त समजावून घेणे, हे अभ्यासकांचे काम असते. प्रतिभारूपांचे जास्तीत जास्त आकलन करण्यासाठीच कालचैतन्य आणि प्रतिभावंत यांचे नाते आपण जोडत असतो. युगप्रेरणा आणि युगप्रवर्तक यांचे संबंध आपण धुंडाळत असतो. जी. एं च्या निर्मितीने एक आव्हान अभ्यासकांसमोर कायमचे उभे केले आहे.

माणसाच्या माणूसपणाची एक न्यूनताव्यंजक छद्मी अशी व्याख्याच जणू जी. एं. नी मनाशी बाळगलेली असावी. प्रा. हातकणंगलेकरांना लिहिलेल्या एका पत्रात त्यांनी येशू ख्रिस्ताबद्दल दोन प्रसंगी आपणास विलक्षण आपुलकी वाटली, असे म्हटले आहे. त्यांपैकी पहिला प्रसंग म्हणजे अत्यंत क्षुधित अवस्थेत एका फळ नसलेल्या झाडाला त्याने चिडून दिलेला शाप आणि दुसरा प्रसंग म्हणजे एका स्त्रीने त्याच्या डोक्यावर अत्तर ओतले म्हणून या अपव्ययासंबंधी टीका करणाऱ्या लोकांना येशूने जे उत्तर दिले ते! अत्तराचा पैसा गोरगरिबांसाठी खर्च केला नाही, कारण गोरगरीब तर सदैव आहेतच, मी मात्र आज आहे उद्या नाही, असे येशूचे उत्तर होते. जी. एं.च्या या आवडीमागे एक दृष्टी आहे. त्यांना आदर्श किंवा आदर्शवत असा देवच केवळ नव्हे, तर माणूसही मनापासून मान्य नाही. माणसाच्या पराधीनतेचे आणि परवशतेचे त्यांना विशेष अगत्य आहे. त्यामुळेच की काय सामाजिकतेबद्दलची एक प्रकारची अढीच त्यांच्या मनात निर्माण झाली असावी. लेखनात सामाजिक आशय का असावा, अशी जी. एं.ची पृच्छा आहे. "माणसाला माणूस म्हणून जगताना जे अटळपणे






भोगावे लागते, तेच केवळ वाङ्मयविषय होऊ शकते–" अशी त्यांची भूमिका आहे. " मनुष्याला मानव म्हणून जगताना (दुर्दैवाने) समाजात राहावे लागते हे खरे. पण हे सामाजिक जीवन अंगावरचे वस्त्र आहे, त्वचा नव्हे, " असे जी. एं.चे म्हणणे आहे. त्यांच्या प्रतिभा-धर्माच्या संदर्भात त्यांचे हे म्हणणे आपण समजून घेऊ शकतो. आणि आपल्या भूमिकेशी सातत्याने चिकटून राहाणे ही गोष्टही सोपी नाही. त्यामुळे लेखकाच्या व्यक्तिगत स्वातंत्र्याचा आदर करून जी. एं. नी माण-साच्या अपूर्णतेची जी कल्पना सतत मनाशी बाळगली, त्या कल्पनेचा तरी परिपूर्ण असा आविष्कार त्यांच्या लेखनातून झाला किंवा काय एवढे पाहणे हेच आपले काम होय. कथालेखनात त्यांनी केलेले प्रयोग, त्यांची प्रतिमा-सृष्टी, कल्पनाशक्ती, शब्दकळा ही सर्व साधने त्यांनी मानवी जीवनाची जी एक व्याख्या मूर्त करण्यासाठी वापरली, ती व्याख्या सर्व घटकांसह त्यांच्या लेखनातून खरोखरच दिसते किंवा काय, हे आपण पाहिले पाहिजे. माणसाची अपूर्णता ही एक चित्रविचित्र आणि अर्थघन अशी गोष्ट आहे. नराचा नारायण करण्याचे आणि नारायणाचे नरात रूपांतर करण्याचे सामर्थ्य या संकल्पनेत आहे. नियती, व्यक्ती आणि व्यक्ती यांच्या गूढ-गहन नात्यांतूनच केवळ व्यक्तिजीवनच नव्हे, तर सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनही अधिक अर्थपूर्ण, अधिक आशयसंपन्न ठरू शकते. राम आणि कृष्ण हे इतिहासातीलच काव्यनायक. पण व्यास-वाल्मिकींच्या प्रतिभेनेच त्यांना एकाच वेळी देवत्वही प्राप्त करून दिले आणि माणूस म्हणून परवशताही बहाल केली. अर्थात देव किंवा परमेश्वर या माणसांनीच निर्माण केलेल्या कल्पना आहेत. माणसाच्या माणूस म्हणून असणाऱ्या मर्यादा या कल्पनांनाही आहेत. अखेर आपली कला काय किंवा साहित्य काय, ही मानव-सापेक्षच आहेत. सामाजिकता ही मानवसापेक्षतेचेच एक रूप आहे. जी. एं. नी आपल्या 'पुनर्जन्म' किंवा 'प्रदक्षिणा' यांसारख्या कथांतून काही अभ्यासकांनी शोधलेल्या सामाजिकतेबद्दल नापसंती व्यक्त केली आहे. मला वाटते, कुठेतरी जी. ए. हे माणसाच्या माणूस म्हणून असणाऱ्या काही गोष्टींचा जणू आकस बाळगून आहेत. अर्थात त्यांना असेही वाटते, की वाचकांना सामाजिकतेचा वास येणाऱ्या त्यांच्या कथा त्यांच्या दृष्टीने फसलेल्या कथा आहेत. अशा कथांमधून त्यांना मुळात जे साधावयाचे होते, ते साधणे त्यांना जमले नाही. त्यांची प्रतिक्रिया किंवा लेखकाची प्रतिक्रिया म्हणून हे ठीकच आहे. परंतु आदर्श किंवा परिपूर्ण माणसाप्रमाणेच आदर्श आणि परिपूर्ण असे साहित्य आणि रसिकता या गोष्टीही त्यांना मनापासून पसंत नसाव्यात. त्यामुळे त्यांच्या लेखनातील सामाजिक परिमाण जाणवणारी रसिकता त्यांना पटली नाही.

पुष्कळदा वाटते, जी. एं.च्या मनात माणूस आणि लेखक यांच्यातील एक कलह धुमसत असावा. माण-साची सामाजिकता ही केवळ साहित्याच्या दृष्टीने नव्हे, तर एकूणच मानवी जीवनाच्या संदर्भात गौण बाब आहे, असे त्यांना वाटत असावे. सामाजिकता हे अंगा-वरचे वस्त्र आहे हे खोटे नाही. पण अनेकांच्या बाब-तीत ते अंगावरची त्वचाही असते हेही खरे आहे. किंबहुना कधीकधी त्वचेइतकेच वस्त्रांनाही मोल असते, हेही खरे आहे. माणसाबद्दलचा एक प्रकारचा परात्म-भाव जी. एं.त असावा आणि हा परात्मभाव मुख्यतः माणसाच्या सामाजिक जीवनाबद्दलचा असावा, असे वाटते. या परात्मभावाचे मूळ त्यांच्या खाजगी आयु-ष्यात असेल किंवा काय ? जी. एं. नी आमरण ब्रह्मचर्य-व्रत पाळले. समाजापासून ते दूर राहिले. गृहस्थाश्रम असे आपण ज्याला पारंपरिक अर्थाने म्हणतो, तो व्यक्तिजीवनाचा अर्थपूर्ण असा टप्पा त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवांतील ठरू शकला नाही. आयुष्य हा अखेरपक्षी एक हरण्याचा डाव असला, तरी त्या डावात देवाण-घेवाणीचे फार मोठे अर्थपूर्ण नाटच असते आणि या नाटचाची कमीअधिक प्रचीती माणसाला आपल्या खाजगी जीवनातूनच येत असते. सांसारिक जीवनाची अनेक अर्थपूर्ण चित्रे जी. एं. नी काढली, रेखाटली. प्रतिभावंताला प्रत्यक्ष अनुभवाची गरज असते, असे मुळीच नाही. एवढेच की, अपूर्णतेच्या आणि पर-वशतेच्या वाटेला लागलेला माणूस आपल्या वाट-चालीत पूर्णतेचे आणि स्वतंत्रतेचे काही क्षण गोळा करीत जातो. हेही मानवी जीवनाचे, मानवी अपूर्ण-तेचे एक सत्य आहे. या सत्याकडे जी. एं. नी फारसे लक्ष दिले नाही हे खरे. त्यांच्या जगण्याचे काही रहस्य होते आणि ते त्यांच्या जगावेगळ्या जीवन-शैलीत दिसून येते. त्या रहस्याचा या गोष्टीशी कितपत संबंध होता, हाही एक पुढीलांच्या अभ्यासाचा विषय राहील, असे मला वाटते. रसिकसंपर्क किंवा सामाजिक



अनुक्रमणिका

सहभाग या गोष्टींत एक लेखक म्हणून आपल्याला मुळातच काही रस नाही, असे जी. एं. नी म्हटले आहे. अभ्यासकाचा प्रश्न असा, की त्या गोष्टींत या लेखकाला रस का नाही ? जी. एं. च्या कोशगत अशा जीवनशैली-मुळे या प्रश्नाचेही उत्तर निर्विवादपणे देणे अवघड आहे.

पॉप्युलर प्रकाशनचे श्री. रामदास भटकळ यांनी 'अक्षर' (१९८७) या दिवाळी अंकात जी. एं. संबंधी एक चांगला लेख लिहिला आहे. जी. एं. च्या कलाविषयक अशा काही आवडीनिवडींची त्यातून थोडीफार कल्पना येते. उदा. , आपल्या कथासंग्रहाच्या मुखपृष्ठाबद्दल ते फार जागरूक असत. काही मुखपृष्ठचित्रे त्यांना आवडलीही नाहीत. एका संग्रहासाठी त्यांनी स्वत:च आपल्या एका विद्यार्थ्याची म्हणून दोन चित्रे सुचविली होती. रामदास भटकळांनी या संदर्भात एक टिप्पणी केली आहे, की कदाचित ती चित्रे स्वत: जी. एं. नीच काढली असावीत ! 'निळे पाणी' या माझ्या कथासमीक्षेवरील पुस्तकाचे मुखपृष्ठ त्यांना आवडले होते. ते सुरेख आहे, असे त्यांनी म्हटले खरे; पण त्यावर चित्रकाराचे नाव कुठेही नाही, हे कसे, असा प्रश्नही त्यांनी पत्रातून विचारला होता. जी. एं. नी हा प्रश्न का विचारावा, हे मला अजूनही समजले नाही. चित्रकलेची अभिज्ञता ही जी. एं. च्या कलात्मक व्यक्तिमत्त्वाची एक बाजू असू शकेल. चित्रकलेतील रंग आणि रेखा यांच्या अभिव्यक्तीला एक वस्तुनिष्ठ असे अस्तित्व असते. चित्र पाहताना चित्रकाराचा विचार गौणच असतो. चित्रकाराची रसिकसंपर्कता किंवा सामाजिक सहभाग यांना काहीही महत्त्व नसते. कथा आणि तिचा वाचक यांमध्ये लेखक हा लेखक म्हणून आणि माणूस म्हणून महत्त्वाचा नसतो. ही भूमिका आणि चित्रकलेची जी. एं. ची आवड यांत कुठेतरी साधर्म्यअसावे, असे उगाचच वाटते.

समीक्षक या प्राण्याबद्दलही जी. एं. ची भूमिका काय होती, याबद्दल अनेकांना कुतूहल आहे. त्यांच्या कथांची परीक्षणे, समीक्षणे ते वाचीत असत. त्याबद्दलच्या प्रतिक्रियाही त्यांनी आपल्या निवडक मित्रमंडळीत प्रत्यक्ष चर्चेने किंवा पत्ररूपाने व्यक्त केल्या आहेत. सगळ्या श्रेष्ठ लेखकांची जी एक समान अशी खंत असते, ती खंत जी. एं. ना होती यात शंकाच नाही. तरीदेखील आपल्या लेखनाचे काही एक समाधानकारक असे मर्म एखाद्या अभ्यासकाने दाखवून दिले आणि ते जी. एं. नी ऐकले किंवा वाचले, तर ते मनःपूर्वक आपले समाधान व्यक्त करीत. प्रसिद्ध कवी ग्रेस यांच्या संपादकत्वाखाली काही काळ चाललेल्या 'संदर्भ' या नियतकालिकात मी त्यांच्या 'तळपट' या कथेसंबंधी एक लेख लिहिला होता. तो जी. एं. ना आवडला असे माझे ज्येष्ठ स्नेही प्रा. हातकणंगलेकर यांच्याकडून समजले. 'हंस'मधील 'विदूषक' या जी. एं. च्या कथेवरील माझा लेखही त्यांना आवडल्याचे अशाच प्रकारे मला समजले. मराठीतील समीक्षा कुचकामी आहे, असे सामान्यतः सगळेच मोठे लेखक मानीत असतात. पु. भा. भावे यांच्या 'मुक्ति' या कथेवरील माझा सविस्तर लेख 'समाजप्रबोधन पत्रिके'च्या एका अंकात आला होता. भावे यांनी कुणाच्यातरी सांगण्यावरून तो वाचला आणि त्यांच्या गिचमिड आणि गच्च हस्ताक्षरातील एक कार्ड एक दिवस मला मिळाले. त्यात प्रारंभी मराठीतील कथासमीक्षा वाचण्यासारखी नसते म्हणून मी ती कधीही वाचीत नाही, असे वाक्य होते. पुढे मात्र माझा लेख आवडल्याचे म्हटले होते. मराठीत अशीही समीक्षा असू शकते, याचे कौतुकही त्यांनी केले. 'विदूषक' आणि 'तळपट' या दोन्ही कथांवरील लेखांबाबत जी. एं.नी दिलखुलासपणे आपले समाधान प्रा. हातकणंगलेकरांच्याकडे व्यक्त केले होते.

पण जी. एं. ची समीक्षादृष्टी अत्यंत चोखंदळ आणि बारकावे पाहणारी होती, हेही तितकेच खरे. 'विदूषक' या कथेच्या संदर्भात मी डिफरन्ट ड्रम्स याचे भाषांतर दूरचे डिंडिमध्वनी असे केले होते. त्यातील चूक जी. एं.नी बरोबर हेरली. वेगळे किंवा निराळे डिंडिमध्वनी असे भाषांतर अधिक बरोबर झाले असते, असे त्यांचे म्हणणे. का कुणास ठाऊक, पण एका परम अर्थाने मला दूरचे डिंडिमध्वनी हे भाषांतरच अधिक स्वीकारार्ह वाटले. दुसरे किंवा वेगळे किंवा निराळे आवाज हे एका लाक्षणिक अर्थाने दूरचेच आवाज असतात, असे मला ( उगाचच ) वाटत राहिले. कलेक्टिव्ह अन्कॉन्शस या युंगच्या संकल्पनेच्या संदर्भात मी केलेला एका कथेच्या समीक्षेवरील लेखातील निर्देश योग्य नाही असे जी. एं नी पत्रात लिहिले होते आणि ते बरोबर होते. 'निळे पाणी' हे माझे पुस्तक माझ्या सांगण्यावरून






माझे प्रकाशक मित्र अनिल मेहता यांनी जी. एं. ना पाठविले होते. मेहतांना त्याची पोच देताना त्यांनी एक पत्र लिहिले. त्यात मराठीतील समीक्षकांबद्दलचा त्यांचा दृष्टिकोण दिसून येतो : "साधारणपणे मराठी समीक्षेत दोन तऱ्हा दिसतात. एक म्हणजे नवरात्रात मूळ मूर्तीवर आपल्याजवळील कपडे (अनेकदा चिंध्याच) चढवून अवतार सजविणे ही. दुसरी म्हणजे अत्तरांच्या दुकानात जाऊन वॉटरबरीज कांपाउंड मागणे व इतक्या बाटल्या असूनही आपणाला हवी असलेली बाटली तेथे नाही म्हणून नाक मुरडणे ही होय. मूळ मूर्ती कसली आहे हे न्याहाळणे किंवा कोणत्या वस्तूंसाठी हे दुकान अस्तित्वात आले आहे, हे पाहाणे जुनाट दृष्टीचे समजले जाते." जी. एं. च्या या विचारांतून त्यांचा समीक्षकाबद्दलचा दृष्टिकोणही लक्षात येतो. मूळ साहित्यकृतीचे संपूर्णपणे आणि यथार्थपणे अवलोकन करणे, आकलन करणे हे समीक्षकाचे कार्य आहे. त्याचप्रमाणे मूळ साहित्यकृतीचे प्रयोजन नीटपणे लक्षात घेणे, ही त्याची जबाबदारी आहे. याच पत्रात जी. एं. नी माझ्या लेखनातील संयम आणि नम्रता या गुणांचा उल्लेख केला आहे. जी. एं. ना अप्रिय असणाऱ्या समाजातही हे गुण गुणच मानले जातात, हे दुर्दैवाने ( की सुदैवाने ? ) खरे आहे. अशा गुणांनी केलेली समीक्षा सर्जनशील लेखनाइतकीच कुलवंत होऊ शकते, असा त्यांचा अभिप्राय आहे. जी. एं. चे वाचन, कला-साहित्याचा व्यासंग यांबद्दल मला तरी फारशी माहिती नाही. तथापि साहित्यविचारांतील महत्त्वाच्या बाबी त्यांना मार्मिकपणे ज्ञात होत्या आणि अशी वाङ्मयीन अभिरुची, समृद्ध आणि सखोल व्यासंगाविना संपादन करणे अवघड आहे. जी. एं. नी समीक्षालेखन करावयास हवे होते. इंग्रजीच्या मराठी प्राध्यापकांनी गेल्या शे-दीडशे वर्षांत मराठी समीक्षेची फार मोठी उपेक्षा केली असे वाटते. आधुनिक मराठी वाङ्मयाचा मोठा आधार इंग्रजी साहित्य हा आहे, यात शंकाच नाही. त्यामुळे इंग्रजी साहित्यविचार मराठीत सतत चांगल्या प्रकारे येणे, चिकित्सक भाष्यासह येणे उपयुक्त ठरले असते. तथापि गेल्या दीडशे वर्षांची इंग्रजी शिक्षणाची आपली परंपरा असूनही इंग्रजीच्या फार कमी प्राध्यापकांनी मराठी समीक्षाविचारांत भर टाकण्याचा प्रयत्न केला. अलीकडच्या दोन-तीन पिढ्यांत मात्र ही परिस्थिती बदलली आहे. जी. एं. नी कथालेखन केले. समीक्षालेखन केले नाही हे खरेच. तथापि त्यांच्या पत्रव्यवहारात त्यांचा साहित्यविचार आलेला आहे आणि हा पत्रव्यवहार चांगल्या प्रकारे संपादित करून प्रसिद्ध होणे उपयुक्त ठरेल.

'निळे पाणी'च्या संदर्भात जी. एं. नी लिहिलेल्या पत्रात सामाजिक संदर्भांचा त्यांचा नावडता विषय त्यांनी पुन्हा एकदा उपस्थित केला आहे. एका कथेला सामाजिक संदर्भ नाही, असे त्या पुस्तकातील एक विधान आहे. हे माझे विधान "केवळ वर्णनात्मक असल्यास काही बिघडणार नाही; पण ते मूल्यात्मक असल्यास मतभेदास वाव आहे", असे त्यांनी म्हटले आहे. कदाचित जी. ए. ज्या सामाजिक संदर्भाचा सतत निषेध करीत आले, त्या सामाजिक संदर्भाचा पुरस्कार करणारे अभ्यासक आणि स्वतः जी. ए. यांच्यात खरोखरच दोन ध्रुवांचे अंतर आहे किंवा काय, अशी एक शंका येत राहाते. उठसूट दिसेल ती खरीखोटी सामाजिक समस्या घे आणि तीवर लेखन कर, असे कोणताही समंजस अभ्यासक म्हणणार नाही. सांप्रदायिक किंवा विचारप्रणालीय (आयडियालॉजिकल) चौकटीत साहित्य लिहिण्याचा आग्रहही साहित्याचा समतोल अभ्यासक धरणार नाही. एखाद्या साहित्यकृतीचे सामाजिक दृष्टीनेच म्हणजे काहीसे पक्षपाती वा एकांगी असे परीक्षण करण्याचा हट्टही कोणी धरणार नाही. साहित्याची सामाजिकता ही मूल्यकल्पना नाही, ती अशा अर्थाने. म्हणजे अत्तरांच्या दुकानात जाऊन औषधाची मागणी करू नये, असा त्याचा अर्थ आहे. पण औषधाच्या दुकानात जाऊन, औषधाची गुणवत्ता लक्षात घ्यावयाची की बाटलीचे रूप, रस, गंध इ. विचारात घ्यायचे, याचाही विवेक केला पाहिजे. प्रचाराच्या किंवा सामाजिक परिवर्तनाच्या प्रकट हेतूने जे साहित्य निर्माण होते, त्याचा विचार त्या हेतूच्या संदर्भातही करणे आवश्यक आहे. पण खरे तर, साहित्याच्या बाबतीतही सामाजिकता हे मूल्य ठरू शकते. डॉस्टॉव्हस्कीसारख्यांच्या कादंबऱ्या या संदर्भात नमूद करता येतील. साहित्याची गुणवत्ता काहीशा श्रेणीबद्ध अशा निकषांनी निश्चित करण्याची पद्धत आहे. या श्रेणीत सामाजिकता हाही एक निकष असू शकतो. म्हणजे एखाद्या साहित्यकृतीतील सामाजिकतेचा व्याप आणि खोली यांचाही विचार करणे उचित ठरते. पण याचा अर्थच असा, की शब्दांचे आणि वावदूकतेचे फसवे अडसर दूर केले, तर जी. ए. जे म्हणतात

ते आणि ते ज्याला निषिद्ध मानतात त्या सामाजिक संदर्भाचे पुरस्कर्ते यांच्यात अंतिम पृथःकरणात काही वाद उरत नाही. सामाजिकतेचा पुरस्कार करण्यामागे पुष्कळदा सामाजिक वातावरण आणि साहित्यक्षेत्रातील काही सामाजिकताविरोधी फसवे आग्रह यांची ऐतिहासिक पार्श्वभूमी असते. त्यामुळे कधीकधी या पार्श्वभूमीवर सामाजिकता ही एक मूल्यकल्पना आहे, असेही प्रतिपादन करण्याची तात्कालिक ऊर्मी निर्माण होते. अलीकडच्या काळातील दलित, ग्रामीण साहित्यप्रवाहांच्या संदर्भात अशा प्रकारेच सामाजिकतेच्या मूल्यकल्पनेचा आग्रह धरण्यात आला, त्यामागे आपल्या कोत्या आणि करंट्या सामाजिक जाणिवेला अधिक डोळस आणि व्यापक करण्याचीच भूमिका होती. गिरगाव आणि सदाशिव पेठ एवढीच आपली सामाजिकता आहे, आणि तेथे जे काही आहे तेवढेच कलासाहित्याचे विषय आहेत, अशी संकुचित दृष्टी आपल्या वाङ्मयीन संस्कृतीच्या दृष्टीने हितकारक ठरणार नाही. आपला समाज आणि आपली सामाजिकता या गोष्टी मूल्यात्मक असोत वा नसोत, त्या नेमक्या केवढ्या आहेत, कशा आहेत हे तरी निदान आपल्याला माहीत असले पाहिजे. संपूर्ण आत्मज्ञान हेही एक मूल्यच आहे. अशी माहिती करून देणे हे कलासाहित्याचे काम नाही हे म्हणणेही चूक नाही. पण हे काम ज्यांचे आहे, ते जर ते काम करीत नसतील, तर कलासाहित्याने हे सामाजिक दायित्व एका विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीत केले तर काय बिघडले? कदाचित या नव्या क्षेत्रांत प्रवेश करून आपल्या कलासाहित्यालाही काही एक नवे संचित संपादन करता येईल. त्याचबरोबर या क्षेत्रात कलासाहित्याला जो धोका आहे, त्याचेही भान राखणे उचित ठरेल. जी. एं. नी सामाजिक संदर्भाबद्दल अखेरपर्यंत जो एक नाराजीचा सूर जपला, त्याच्या मागे कदाचित सामाजिक वातावरणाबद्दलचे त्यांचे औदासीन्य कारणीभूत असेल, असे वाटते. कदाचित जनतासंस्कृती (मास कल्चर) ही कल्पना व सामाजिकता यांचे एक मानीव समीकरण त्यांच्या मनात असावे! जनता-संस्कृतीचा उदय होत आहे व त्यामुळे कलासाहित्यक्षेत्रांचे लोकीकरण होऊन त्यांचे शुद्ध स्वरूप भ्रष्ट होत आहे, अशी काहीशी अभिजनवादी (एलिटिस्ट) प्रतिक्रिया जी. एं. च्या मनात मूळ धरून असावी...! एक गोष्ट मात्र आपण निर्विवादपणे म्हणू शकतो, ती अशी की कलासाहित्याच्या क्षेत्रात सामाजिक संदर्भाबद्दल जी एक समतोल भूमिका संभवते, अशा भूमिकेपासून जी. एं. ची भूमिका फार दूर नव्हती. कारण व्यक्तिजीवनाच्या व्यामिश्रतेची इतकी सखोल आणि प्रभावी जाणीव व्यक्त करणारा हा प्रतिभावंत, सामाजिक संदर्भांच्या जटिलतेला विशिष्ट ऐतिहासिक पार्श्वभूमीवर पूर्णतः नाकारू शकेल, असे वाटत नाही. खरे तर, समाज काय आणि परमेश्वर काय ही माणसांचीच निर्मिती आहे. माणसे युगानुयुगे जे काही अनुभवीत आली, त्याचा अर्थ तरी काय होतो? परमेश्वर हा घडोघडीचा भ्रमनिरासच खरा, पण तो अनंत घटकांचा सोबतीही आहे. आणि समाज हा क्षणोक्षणीची दंतकथा खरी; पण अक्षरकाळची ती सत्यकथाही आहे. जी. एं. नी माणसाची अपूर्णता खूप सूक्ष्मपणे न्याहाळली; पण यात माणसांची, आदर्शांची, परिपूर्णतेची, सार्थकतेची आणि साफल्याची स्वप्ने मात्र पाहिली नाहीत. ही स्वप्ने हेही मानवी जीवनाचे एक सत्य आहे. १९५० ते १९७० या दोन दशकांत मराठी व्यक्तिमन आणि समूहमन कुठेतरी माणसाची स्वप्नक्षमता हरवून तर बसले नव्हते? या हरपलेल्या श्रेयाची सतत जाणीव जी. एं. च्या कथा देत राहतात.

समाजाची, तसेच भारतीयत्वाची प्रकट अशी जाणीव जी. एं. च्या कथांतून होत नाही; तथापि मानवी जीवनाबद्दलच त्यांचा दृष्टिकोन आणि त्यांचा नियतिवाद यांचे मूळ भारतीय सत्त्वधारेत (इथॉस) आहे, असे म्हणता येईल. माणसाची अपूर्णता आणि नियती या गोष्टी भारतीय संस्कृतीत पूर्णपणे आणि प्रभावीपणे स्वीकारलेल्या असल्या, तरीही माणसाच्या अंतिम श्रेयसच्या दृष्टीने त्यांच्याकडे लीलावृत्तीने किंवा एक माया म्हणून किंवा एका स्थितप्रज्ञतेच्या भूमिकेवरून पाहण्याची भूमिकाही भारतीय सत्त्वधारेत आहे. म्हणून भारतीय मानस स्वभावतः व प्राधान्याने नियतिवादी असले, तरी ते नियतिशरण नाही. म्हणूनच 'विदूषक' ही कथा शोकात्मिका ठरत नाही. आपल्याकडे शोकात्मिका म्हणूनच नाहीत. नियतिवादाच्या भारतीय पथावरून जी. ए. चालत राहिले, पण त्या मार्गाचे शांतपणे आणि संपूर्णपणे अवलोकन त्यांनी केले नाही. ही अपूर्णताही भारतीय मनाचीच निदर्शक आहे काय? इतिहासाच्या शक्तींनी ग्रासलेले विशिष्ट कालखंडातील हे भारतीय मन आहे काय?

अनुक्रमणिका

जी. एं. नी कादंबरी हा प्रकार हाताळला नाही. श्री. रामदास भटकळांकडे त्यांनी या बाबतीत खुलासा केला होता. कादंबरीतील इतके श्रेष्ठ आणि महान साहित्य त्यांनी वाचले होते, की त्यामुळे हा प्रकार हाताळावा, अशी आपली हिम्मत झाली नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. पण खरे तर, जी. एं. चा प्रतिभाधर्म त्यांना ज्या वाटेने चालवीत होता, त्या वाटेवरच कादंबरीला अनुकूल असा परिसर नव्हता. त्यांच्या अनेक कथा या लघुकादंबऱ्यांसारख्या आहेत. पण आशयाची गुंतवण कादंबऱ्यांच्या थाटात, वेगळ्या दृष्टीने, वेगळ्या बाजात आणि साजात करावी लागते. आणि यासाठी सामाजिक संदर्भांची नितांत गरज असते. अत्यंत नीरस, रुक्ष, जुजबी असे सामाजिक तपशील परिश्रमपूर्वक गोळा करून त्यांना अर्थपूर्ण करावयाचे असते. पण हे सर्व जी. एं. च्या प्रकृतिधर्माविरुद्ध होते. म्हणूनच कादंबरीच्या वाटेला ते कधी गेलेच नाहीत.

आता जी. ए. आपल्यांत नाहीत. त्यांचा वारसा सांगणारी कथा मराठीत निर्माण होईल की नाही, हे कसे सांगणार ? अनन्यसाधारणता हे एक प्रतिभावंताचे लक्षण मानले जाते. ते जी. एं. ना पूर्णपणे लागू पडते. तेव्हा मराठीत जी. ए. हे एकमेवच राहणार यात शंका नाही. तथापि व्यक्तिजीवनाची व्यामिश्रता, प्रतिमासृष्टीची अपूर्व किमया, प्रमाथी कल्पकता आणि आगळीवेगळी शब्दकळा हा त्यांचा वारसा पुढीलांना आपापल्या प्रकृतिधर्मानुसार चालविता येईल असे वाटते. अभ्यासाचे एक कायमचे आव्हान समीक्षकांपुढे जी. एं. नी उभे केले आहे. जी. ए. गेले, पण त्यांनी मराठी कथा सर्वार्थांनी श्रीमंत केली. व्यक्तिशः मी जी. एं. च्या एका आत्मीयतेच्या ऋणात आहे. 'निळे पाणी' वाचल्यानंतर त्यांनी लिहिलेल्या पत्रात मला काही कथा आवडाव्यात असे म्हटले होते. सदानंद रेगे, जयवंत दळवी, चि. त्र्यं. खानोलकर, विद्याधर पुंडलीक आणि विजय तेंडुलकर यांच्या त्या विशिष्ट कथा. मला या कथा आवडाव्यात याचा अर्थ मी या कथांवर लिहावे, असेच बहुधा जी. एं. ना अभिप्रेत असावे. त्यांना श्रद्धांजली वाहताना त्यांनी सूचित केलेले हे काम करण्याचे वचन मला द्यावेसे वाटते.



## साभार पोच

* 'तू' (कवितासंग्रह)– विनायक वाघमारे; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अमळनेर– ४२५४०१; १९८७; पृ. १४२; किं. २० रुपये.
* **भर्तृहरिकृत शतकत्रयी**– संपा. ल. गो. विंझे; शुभदा–सारस्वत पब्लिकेशन्स प्रा. लि, पुणे– ४११००५; पुनर्मुद्रण १९८६; पृ. ३४०; किं. ६० रुपये.
* **फळबाग : तत्त्वे आणि पद्धती**– अ. व्यं. पाटील; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–४११०३०; १९८७; पृ. १८०; किं. ३५ रुपये.
* **संकरित टोमॅटो**– नी. गो. भुजबळ, वि. आ. खैरे; कॉन्टिवेन्टल प्रकाशन, पुणे–३०; १९८७; पृ. ८०; किं. १५ रुपये.
* **स्मरणांची कारंजी**– यशवंत मनोहर; समुचित प्रकाशन, २/अ, विद्यापीठ प्राध्यापक निवास, अमरावती मार्ग, नागपूर–४४००१०; १९८७; पृ. ५३; किं. २० रुपये.
* **ससा-पालन**– डॉ. अनिलकुमार कुलकर्णी; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे– ३०; १९८७; पृ. ८०; किं. २० रुपये.
* **खेळिया**– (दोन अंकी दलित–नाटक) – दत्ता भगत; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; १९८७; पृ. ७८; किं. १२ रुपये.
* **तुंबाडचे खोत**– (खंड पहिला, भाग १ व २) – श्री. ना. पेंडसे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन; विजयानगर, पुणे–३०, १९८७; पृ. ६२४; किं. ९५ रुपये.
* **तुंबाडचे खोत**– (खंड दुसरा, भाग ३ व ४)– श्री. ना. पेंडसे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८७; पृ.६३४ (६२५–१३५८) किं. १२५ रुपये.
* **हैदराबादचा स्वातंत्र्य-संग्राम आणि मराठवाडा**– अनंत भालेराव; प्रकाशक– गोविंददास श्रॉफ, स्वामी रामानंदतीर्थ संशोधन संस्था आणि भारत मुद्रक आणि प्रकाशक लिमिटेड, औरंगाबाद; १९८७; पृ. ६४०; किं. १५० रुपये.

अनुक्रमणिका

# जी. एं. ची दोन पत्रे ¶

– १ –

[ जी. ए. कुलकर्णी यांच्या 'यात्रिक' ('पिंगळावेळ' या कथासंग्रहात अंतर्भूत) कथेच्या संदर्भात हे पत्र आहे. ही कथा प्रथम 'सत्यकथे'च्या ऑगस्ट १९७५ च्या अंकात प्रसिद्ध झाली. लगेचच पुढच्या सप्टें ७५ च्या अंकात प्रा. प्रल्हाद वडेर यांची प्रतिक्रिया आली. तीत त्यांनी ही कथा नसून लेख, तात्त्विक निबंध आहे, असे म्हटले होते. या पत्राच्या पुष्टीदाखल 'सत्यकथे'च्या संपादकांनी, कथेबरोबर जी. एं. नी पाठवलेल्या पत्राचा निर्वाळा दिला होता. जी. एं. नी त्यात म्हटले होते; 'सोबत एक लेख पाठवीत आहे. माझ्या पुष्कळशा कथा या कथा आहेत की नाहीत हे मला बहुतेकदा इतरांकडूनच समजले आहे. पण काही वेळा त्यांच्यात मतभेद असत. सोबतच्या लेखाबद्दल मात्र दुमत संभवत नाही. तो बहुतेक कथा नसावाच.'

– वरील मताचा परामर्श घेणारा व 'यात्रिक' मधले कथात्मक सामर्थ्य उलगडून दाखवणारा एक लेख मी 'सत्यकथे'कडे पाठवला होता. 'सत्यकथे'च्या फेब्रुवारी ७६ च्या अंकात या कथेवर एक चर्चा व त्यात हा लेख प्रसिद्ध झाला. दरम्यान मी त्या लेखाचा सारांश जी. एं.ना दि. ५ सप्टेंबर ७५ च्या पत्रातून कळवला होता. त्यात मी म्हटले होते;

" आकृतिवादाच्या पातळीवर कोणतीही कृती आकृतिबंधाच्या काही किमान गरजा पूर्ण केल्यावर 'कलाकृती' म्हणून सिद्ध होते. तथापि अशा दोन सिद्ध कलाकृतींमधील तरतमभाव ठरविताना काही वेगळे आशयनिष्ठ निकष स्वीकारावे लागतात. आणि मग मानवी जीवनाविषयीच्या मूलभूत प्रश्नांचे कलारूप साकार करणारी कलाकृती श्रेष्ठ ठरते. अशा कलाकृतीमध्ये एऱ्हवी अमूर्त चिंतनशीलतेला समूर्त अशा अनुभवचित्राचा घाट देण्याची किमया कलावंताला साधलेली असते. एऱ्हवी जे तत्त्वचिंतन ग्रांथिक पातळीवरच घोटाळत राहते, ते इथे 'अनुभवाचे बोल' बनून साक्षात व प्रत्ययकारी होते. अशी कलाकृती एका व्यापक अर्थाने 'रूपकाकृती' असते. कारण तिच्यातील अनुभवाचे तात्कालिक स्थलकाल-संदर्भ सुटून तिला अधिक भव्य आशय–परिमाण लाभते. तिच्यातील व्यक्तिचित्रे ही मग केवळ व्यक्तिचित्रे न राहता, त्यांना अधिक व्यापक अशी प्रतीकात्मता लाभते. अशी कलाकृती खऱ्याखुऱ्या अर्थाने 'वैश्विक' (युनिव्हर्सल) असते."

जी. एं. च्या 'यात्रिक' या कथेत सरव्हॅन्टीझच्या 'डॉन क्विक्झोट' या कादंबरीतील डॉन व सॅन्को ही पात्रे एक नवा अन्वयार्थ घेऊन अवतरली आहेत. मानवी जीवनाच्या अंतिम श्रेयाचा, अंतिम मूल्यकल्पनेचा शोध घेण्याच्या मोहिमेवर निघालेला डॉन हा शिलेदार व सॅन्को हा त्याचा साथीदार आहे. त्याला या मोहिमेत, स्वतःला साक्षात्कारी परमज्ञान प्राप्त झाल्याच्या अहंकारात आत्मसंतुष्ट असलेला एक धर्मोपदेशक, तसेच येशू ख्रिस्ताचा विश्वासघात करणारा शिष्य ज्युडास अशा काही व्यक्ती भेटतात व त्यांच्याशी झालेल्या चर्चा-संभाषणांतून त्याच्या असे ध्यानात येते की, अंतिम सत्य, अंतिम ज्ञान, अंतिम धर्मप्रणाली, अंतिम पाप अशा सगळ्या कल्पना सारख्याच निरर्थक व पोकळ ठरतात. जीवनात 'अंतिम' असे काही नसतेच व हे जाणवताच

¶ खाजगी पत्रे छापू नयेत, असा एक सर्वमान्य व शिष्टसंमत संकेत आहे. पण या दोन पत्रांतून जी. ए. कुलकर्णी यांची वाङ्मयीन अभिरुची व भूमिका यांचा काहीसा अंदाज लागत असल्याने ती ज्या व्यक्तींना आली (श्री. एस्. डी. इनामदार, विश्वकोश कार्यालय, वाई व श्री. अनिल मेहता, अभिजात प्रकाशन, कोल्हापूर), त्यांच्या परवानगीने व सौजन्याने छापत आहोत. श्री. इनामदार ह्यांनी त्यांना आलेल्या पत्रा-मागील संदर्भ सविस्तरपणे स्पष्ट केला आहे. श्री. अनिल मेहता ह्यांना आलेल्या पत्रातच त्याचा संदर्भ आहे.

– संपादक

अनुक्रमणिका

अखेर त्याचा भ्रमनिरास होतो. अशा प्रकारची सर्वंकष पराभूततेची जाणीव, जीवनाच्या अंतिमत्वाच्या–अंतिम श्रेयाच्या शोधातले वैयर्थ्य व त्यातून वाट्याला आलेली तीव्र, घोर निराशा ही डॉनला अखेर भ्रमिष्टावस्थेत व्यवहारी जगात व मृत्यूमुखी ढकलते. हा 'यात्रिक' कथेचा थोडक्यात आशय. 'इस्किलार,' 'प्रवासी', 'विदूषक' यांसारख्या त्यांच्या अन्य कथांप्रमाणेच या कथेतही त्यांनी तत्त्वचिंतनपर वैचारिक आशयाला कलात्मक घाट देण्याची किमया साधली आहे.

–प्रस्तुत विवेचनातील सुप्त व सूचक संदर्भ पत्रात विखुरले असल्याने, हा खुलासा आवश्यक वाटतो.

**–एस. डी. इनामदार** ]

G. A. Kulkarni,
Kademani Compound,
Malmaddi, Dharwar–7
8–9–75

सप्रेम नमस्कार,

आपण अत्यंत आपुलकीने लिहिलेले ता. ५ सप्टेंबरचे पत्र मिळाले. पत्राबद्दल फार आभारी आहे.

माझ्या पत्रातील उताऱ्याविषयी : मी श्री. पटवर्धन यांना पत्र लिहिले होते, ते वैयक्तिक होते, आणि साहजिकच त्या पत्राचा सूर Informal, lighthearted होता. त्यातील एखादा भाग असा प्रकट होईल याची मला कल्पना नव्हती. अर्थात् तसे झाल्यामुळे फारसा दिशाकंप झाला असे नाही, पण ते आधी माहीत असते, तर कदाचित मी निराळ्या शब्दांत लिहिले असते इतकेच. पण वाङ्मयप्रकाराबाबत अगदी ठाशीव अशा कल्पना बाळगून काही लोक असतात, आणि त्यांची अशा स्वरूपाचीच प्रतिक्रिया घडून येईल हे मात्र मला थट्टेने सांगावयाचे होतेच. एक गोष्ट मात्र मला मान्य आहे. रूढ झालेल्या (साहित्यप्रकाराविषयींच्या) कल्पना पूर्णपणे बदलण्याला तशाच सामर्थ्याचा लेखक हवा. ते सामर्थ्य माझ्यात नाही. पण मला खात्री आहे की, येत्या पंधरावीस वर्षांत तसा लघुकथालेखक निर्माण होईल, व मग असले प्रश्नच अर्थहीन होतील.

मला मागे 'सत्यकथे'तच आलेल्या एका पत्राची अंधुक आठवण आहे. कोणा एकाने एक कथा पाठवली होती, ती पटवर्धनांनी ललितलेख म्हणून छापली. तेव्हा त्याने तो ललितलेख नसून "लघुनिबंधाच्या अंगाने वाढलेली कथा" असे काहीतरी मनोरंजक स्पष्टीकरण केले होते. श्री. वडेर यांचे नाव मला फारसे परिचित नाही. अर्थात् हा त्यांचा दोष नाही. माझे मराठीचे वाचन, अनेक कारणामुळे, मर्यादितच रहाते. उलट, पटवर्धनांची व माझी फार जुनी ओळख आहे, व हे पत्र छापणार असल्याबद्दल आधीच कळवलेही होते.

तरतमभाव ठरवताना आशयनिष्ठ निकष स्वीकारणे अपरिहार्य असते, हा तुमचा मुद्दा माझ्यापुरता बिनतोड आहे, कारण माझी देखील पूर्वीपासून तीच श्रद्धा आहे. सगळेच अनुभव काही अगदी जिव्हाळी रुतून सल ठेवून जात नाहीत. त्यांच्यात Gradation जरूर असते. पण या ठिकाणी एक अतिशय धोक्याचे वळण आहे. याच ठिकाणी मग, वैयक्तिक अनुभवापेक्षा सामाजिक, विशाल जाणीव जास्त महत्त्वाची, असा एक नवा आग्रह सुरू होतो. बालकवींच्या 'औदुंबर'-पेक्षा त्यांची 'धर्मवीर' ही (सामान्य) कविता जास्त श्रेष्ठ ठरवण्याचे प्रयत्न सुरू होतात. आक्रोशी, उथळ प्रचाराच्या दडपणापासून रक्षण करण्यासाठी आकृतिबंधाचा आग्रह योग्य ठरतो. कारण मग नजर कलाकृतीच्या परिणामाकडे न लागता तिच्या परिपूर्तीवर ठरते. हा प्रश्न बराच गुंतागुंतीचा आहे. त्याबाबत सविस्तर लिहावे लागेल, कदाचित मग स्वतःविषयीदेखील सांगावे लागेल. आणि ते तर मी पूर्णपणे टाळतच आलो आहे. यात विनय नाही, की आढ्यता नाही. वैशिष्ट्य अथवा मोठेपणा तर नाहीच नाही. एक प्रकारचे सोवळे एवढ्याच अर्थाने मी माझ्या लेखनाबद्दल लिहायचे टाळतो, इतकेच.

दोन घटका वेळ घालवण्याचे एक साधन, अशीच समजूत अद्यापही लघुकथेबाबत आहे; आणि मनोरंजन व्हावे ते देखील पोटातील पाणी न हलता, एकही विचार न येता, अशी अपेक्षा असते-

मला तसे वाटत नाही.

त्यामुळे तुमच्यासारख्या एखाद्याने लघुकथेकडे, (माझ्या कथांकडे नव्हे. मी एक केवळ व्यक्ती आहे) अशा विचारशील दृष्टीने पाहिले, की सुख वाटते.







अनुक्रमणिका

त्यामुळे तुमच्या पत्रातील आपुलकीबाबत आभार आहेत, ते त्या तुमच्या दृष्टिकोणाबद्दलही आहेत.

कळावे.

आपला,

**जी. ए. कुलकर्णी**

× × ×

– २ –

G. A. Kulkarni,
Dharwar–7
27th July 1982.

स. न. वि. वि.

'अभिजात प्रकाशन'तर्फे प्रसिद्ध झालेले श्री. रा. ग. जाधव यांचे " निळे पाणी " हे पुस्तक आपण अगत्याने भेट म्हणून पाठवले; या सौजन्याबद्दल मी आभारी आहे. त्यांतील एकदोन लेख मी आधीच वाचले होते, व त्यांबाबत मी प्रा. म. द. हातकणंगलेकर (जे माझेही मित्र आहेत) यांच्याशी बोललोदेखील होतो.

साधारणपणे मराठीत समीक्षेत दोन तऱ्हा दिसतात. एक म्हणजे नवरात्रात मूळ मूर्तीवर आपल्याजवळील कपडे (अनेकदा चिंध्याच) चढवून अवतार सजवणे ही. दुसरी म्हणजे अत्तराच्या दुकानात जाऊन Waterbury's Compound मागणे व इतक्या बाटल्या असूनही आपणाला हवी असलेली बाटली तेथे नाही म्हणून नाक मुरडणे ही होय. मूळ मूर्ती कसली आहे हे न्याहाळणे किंवा कोणत्या वस्तूसाठी हे दुकान अस्तित्वात आले आहे हे पाहाणे जुनाट दृष्टीचे समजले जाते. श्री. जाधव यांच्या लेखनात संयम तर आहेच, पण कलाकृतीकडे पाहताना (त्यांनी माझ्याच दोन कथांवर –विदूषक व तळपट– लिहिले आहे, त्यामुळे कलाकृती हा शब्द वापरताना मला अवघडल्यासारखे वाटते) त्यात एक प्रकारची नम्रता आहे (नम्रता; कमीपणा नव्हे, कोणत्या समीक्षकाला आपल्या लेखनाबद्दल कमीपणा वाटण्याची गरज नाही. काही वेळा समीक्षा सर्जनशील लेखनाइतकीच कुलवंत होऊ शकते.). हा मला वाटते फार महत्त्वाचा गुण आहे. त्यांच्याशी मतभेद होणार नाहीत असे नाही; जरूर होतील (उदा; एके ठिकाणी ते " या कथेला सामाजिक संदर्भ नाही " असे म्हणतात. हे विधान केवल वर्णनात्मक असल्यास काही बिघडणार नाही; पण ते मूल्यात्मक गणल्यास मतभेदास वाव आहे.). पण असा मतभेद असणेही आनंदाचेच वाटते. त्यांच्यावरही त्यांनी कधीतरी लिहावे म्हणून त्यांना रेगे यांची "चंद्र कोरतो सावली", दळवींची "रुक्मिणी", खानोलकरांची, आता नाव आठवत नाही पण एक गारुडी साप मोकळा सोडून आपल्या अविवाहित गरोदर मुलीची हत्या करतो ती कथा– पुंडलिकांची " सामोरी " , तेंडूलकरांची " बेडूक " या कथा त्यांना आवडाव्यात असे वाटून गेले.

पुस्तकाचे मुखपृष्ठ सुरेख आहे, पण चित्रकाराचे नाव कुठे नाही हे कसे ?

कथेमधील अवतरणे देताना ती काव्यातील उतारे असल्याप्रमाणे छापण्यात आली आहेत. त्याला काही कारण आहे ? मला स्वतःला त्यामुळे काही विषेष साधल्यासारखे वाटत नाही. उलट, त्यामुळे डचमळल्यासारखे होते. पान चौदावर Collective Unconscious चा उल्लेख करताना Adler चे नाव आले आहे. ते बरोबर आहे का ?

आपल्या अगत्याबद्दल पुन्हा आभार. हे पत्र श्री. जाधव यांनाही दाखवायला माझी काहीच हरकत नाही. नाहीतर एरव्ही पत्राचे स्वरूप खासगी आहे.

कळावे.

आपला

**जी. ए. कुलकर्णी**

( श्री. अनिल मेहता, अभिजात प्रकाशन, कोल्हापूर–२ यांना आलेले पत्र.)



# ¶इस्लामी संस्कृतीची रूपरेखा – २

कौशिक

इस्लामचा उदय एका विशिष्ट ऐतिहासिक चौकटीत झाला. आणि तिच्या विविध घटकांशी इस्लामचा जो संपर्क आला त्यांच्या प्रभावामुळे मूळच्या इस्लाममध्ये अंतर्भूत असलेल्या प्रवृत्तींचा विकास होऊन त्यांना त्यांचे पक्व रूप प्राप्त झाले. एका दृष्टीने पाहता हा संपर्क केवळ योगायोगाने आला होता. इराण, सिरिया आणि इजिप्त ह्या प्रदेशांत उच्च संस्कृती नांदत होत्या. मुसलमानांनी हे प्रदेश जिंकून घेतले आणि ह्यामुळे ह्या संस्कृतींचाही प्रभाव इस्लामवर पडला.

इस्लामने जी संस्कृती निर्माण केली तिचे मूल्यमापन करताना एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे. आपल्या शेजारच्या देशांच्या तुलनेने अरबी द्वीपकल्प सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेले होते. तेव्हा इस्लामचा प्रारंभीचा विकास ह्या उच्चतर सांस्कृतिक परंपरांशी जुळवून घेण्याच्या प्रक्रियेतून घडून आला. पण अरबी आक्रमकांमध्ये मानसिक आणि राजकीय जोमदारपणा होता. त्यामुळे त्यांनी जिंकलेल्या जमाती जरी संख्येने मोठ्या होत्या आणि अधिक प्रगत होत्या तरी त्या आपल्या जेत्यांना आपल्यात रिचवू शकल्या नाहीत. हळूहळू ह्या जमातींनी इस्लाम धर्म म्हणून स्वीकारला आणि चार शतकांच्या काळात, बायझॅन्टाईन प्रदेश सोडला, तर मध्यपूर्वेतील सबंध प्रदेश प्रामुख्याने मुस्लिम बनला. प्रारंभी अशी कल्पना होती की एखाद्या प्रदेशातील जमातीने कोणत्यातरी अरब टोळीशी तिचे मांडलिक म्हणून नाते प्रस्थापित करेपर्यंत त्या जमातीने केलेले धर्मांतर आणि मुस्लिम जमात हे तिचे नवे स्वरूप सामाजिक व राजकीय दृष्ट्या पक्के होत नसे. पण ह्या समजुतीला इस्लामी धर्मशास्त्रात काही आधार नव्हता. ह्यामुळे ही समजूत हळूहळू गळून पडली आणि अरबेतर जमाती ह्या स्वतःच अरबांइतक्याच पक्वपणे आणि पूर्णपणे मुस्लिम आहेत ही गोष्ट स्वीकारण्यात येऊ लागली.

प्रेषितांच्या सिद्धांतांच्या जडणघडणीवर यहुदी आणि ख्रिस्ती संकल्पनांचा प्रभाव पडलेला आढळतो. कुराणामध्ये प्रेषितांच्या ज्या कथा आलेल्या आहेत त्या बायबलमध्ये प्रविष्ट असलेल्या कल्पना, प्रतिमा आणि घटना ह्यांनी ओतप्रोत भरलेल्या आहेत. प्रेषितांनी प्रतिपादन केलेला एकेश्वरवाद ह्या काही प्रमाणात, ईश्वर त्रिविध आहे ह्या ख्रिस्ती सिद्धांताच्या विरोधात त्यांनी विकसित केला होता. पण महंमदांनी जो जीवनमार्ग आखून दिला तो खणखणीतपणे अरबी होता. यात्रेचा त्यांनी नेमून दिलेला विधी आणि ज्या भाषेत त्यांनी इस्लाम प्रकट केला तिच्या लकबी, तिच्यातील युक्तिवाद ह्या गोष्टीही निखालसपणे अरबी होत्या. (अजून तार्किक तत्त्वज्ञानाचा स्पर्श न झालेल्या ह्या भाषेत जो काहीसा ओबडधोबडपणा होता तोही अरबी होता.) इस्लामच्या आधारस्तंभांमध्ये हाजची यात्रा अंतर्भूत झाल्यामुळे आणि अरबी भाषेतील कुराण हा सर्व धर्मशास्त्राचा आदिम प्रस्थानग्रंथ ठरल्यामुळे बराचसा अरबी सांस्कृतिक वारसा इस्लाममध्ये जतन करण्यात आला. मध्ययुगातील आणि आधुनिक काळातील मुस्लिम संस्कृती ही संमिश्र अशी संस्कृती आहे. तथापि तिच्यावरील अरबी झाक टिकून आहे. एक तर अरबी भाषा ही इस्लामी संस्कृतीची प्रातिनिधिक भाषा म्हणून विकसित झाली. शिवाय 'सर्वश्रेष्ठ मानव' जे प्रेषित महंमद त्यांच्या आणि इस्लामच्या आदिकाळातील खलिफांच्या जमातीचे सदस्य म्हणूनही अरबांची खास ईश्वरदत्त प्रतिष्ठा होती. हदीस– म्हणजे प्रेषितांच्या अखंडित परंपरेने चालत आलेल्या स्मृती, ह्या परंपरेचे दुवे असलेल्या साक्षी-

---

¶ या लेखाचा पहिला भाग सप्टें-ऑक्टो. १९८७ या दिवाळी विशेषांकात प्रसिद्ध झाला होता. हा दुसरा भाग. – संपादक








दारांच्या साखळचा, ह्यातून विकसित झालेल्या प्रेषितांच्या चरित्रकथा, प्रेषितांचे समकालीन आणि त्यांचे महत्त्वाचे वंशज ह्यांच्या बखरी हे साहित्यप्रकार अरबी भाषेत विकसित झाले आणि इस्लामी संस्कृतीच्या सामायिक वारशात त्यांना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. हे साहित्य-प्रकार अरबांनी नव्याने निर्माण केले की ते त्यांनी इतरांपासून घेतले, असा प्रश्न कधीकधी उपस्थित केला जातो. त्याचे उत्तर काहीही असो, अरबांनी ते पूर्णपणे आत्मसात केले ह्याविषयी काही शंका नाही. आपण काही परकी वैचारिक सामग्री आणि परके साहित्य-प्रकार यांचा स्वीकार केला आहे ही जाणीव मुस्लिम पंडित कधीकधी व्यक्त करताना आढळतात. पण मुस्लिम विचारवंतांनी जे काही उसने घेतले असेल त्याची जेव्हा ते अरबी परिभाषेत मांडणी करू शकले आणि त्याचा स्वतःच्या विशिष्ट वैचारिक शैलीत आविष्कार करू शकले तेव्हाच ते प्रभावी ठरले आणि मुस्लिम संस्कृतीत त्याला टिकाऊ स्थान प्राप्त झाले. नाही तर ते वांझोटे ठरते आणि गळून पडते.

ख्रिस्ती देवशास्त्राशी परिचय झाल्यावर मुस्लिमांना आपल्या धार्मिक श्रद्धेचे समालोचन करून, ग्रीक संक-ल्पनांच्या माध्यमातून तिच्या सिद्धांतांची मांडणी करणे भाग पडले. काही शतकांपूर्वी ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेने ह्याच प्रक्रियेद्वारा स्वतःला बौद्धिक रूप प्राप्त करून दिले होते. इस्लामच्या संदर्भात आता ह्या प्रक्रियेचे पुनरावर्तन झाले. मध्ययुगात ख्रिस्ती युरोप आणि आशियातील इस्लामी प्रदेश यांच्यामध्ये एक खोल वैचारिक आणि भावनिक अनुबंध आढळून येतो. सामान्यपणे पाहता त्याच्या अस्तित्वाची ख्रिश्चनांना आणि मुस्लिमांना जाणीव नव्हती. पण तो होता. त्याचे मूळ ज्या समान प्रक्रियेतून ख्रिस्ती आणि इस्लामी देवशास्त्राचा विकास झाला तिच्यात सापडते. इस्लामी जगात नवव्या आणि दहाव्या शतकांत ग्रीक तत्त्व-ज्ञानाचा– ॲरिस्टॉटल, नव-प्लेटोवाद आणि कमी प्रमा-णात स्टोइक तत्त्वज्ञान यांचा– कसून अभ्यास होत असे. पण तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात म्हणा किंवा त्याच्याहून कमी मूलभूत असलेल्या साहित्याच्या क्षेत्रात म्हणा, शुद्ध ग्रीक विचारांचा स्वीकार करायला हे युग तयार नव्हते. बहुसंख्य मुसलमानांच्या दृष्टीने ॲरिस्टॉटलचे इस्लामी अनुयायी– फलासिफा (फिलॉसॉफर्स)– नेह-मीच 'परके' राहिले. उलट, 'मुताझिलां'वर जरी पाखंडी म्हणून टीका झाली तरी ते 'घरचे' राहिले. साहित्यातही हाच प्रकार दिसून येतो. कदामचे (मृत्यू ९२२) साहित्यशास्त्र ग्रीक संकल्पनांवर आणि वर्गी-करणावर आधारले होते. ते रेखीव आणि सुव्यवस्थित असूनही मान्यता पावू शकले नाही. उलट, अल्-मतझ (मृत्यू ९०८) यांचा साहित्यविचार अपुरा आणि विस्कळीत असूनही प्रभावी ठरला. कारण ग्रीक संक-ल्पनांचे अरबीकरण करण्यात अल्-मतझ यांना अधिक यश लाभले होते.

इस्लामी जमातीच्या धार्मिक गरजांना ह्या परकी कल्पनांनी फारसा स्पर्श केला नाही. देवशास्त्राला अखेरीस ह्या धार्मिक गरजांपुढे नमावे लागते. ९व्या शतकातील एक मोठा वाद 'ईश्वर आणि त्याचा ग्रंथ (कुराण) यांच्यामधील संबंधाचे स्वरूप काय आहे' ह्याविषयी होता. 'ईश्वर आणि 'लोगोस' यांच्या-मधील संबंधाचे स्वरूप काय आहे?' ह्या ख्रिस्ती देवशास्त्रातील प्रश्नासारखा हा प्रश्न आहे. दुसरा संबं-धित प्रश्न म्हणजे ईश्वर आणि त्याचे गुणधर्म यांच्या-मधील संबंधाविषयीचा प्रश्न.) मुताझिलांचे म्हणणे असे होते की कुराण ही ईश्वराची निर्मिती आहे आणि म्हणून त्याचे स्थान दुय्यम आहे. कुराण नित्य आहे असे मानले तर कुराण प्रति-ईश्वर ठरेल. म्हणजे बहुदेवतावाद स्वीकारावा लागेल. इस्लामी सरकारने मुताझिलांची बाजू उचलून धरली. पण सनातनी मत कुराण नित्य आहे, अनिर्मित आहे आणि म्हणून ईश्वराशी समकालीन आहे असे होते. लोकभावनाही सनातनी मताच्या बाजूची होती. म्हणून काही काळानंतर सरकारनेही मुताझिलांना दिलेला पाठिंबा काढून घेतला. कुराणाविषयी जो असीम भक्तिभाव जन-मानसात होता तोच सनातनी मतात प्रतिबिंबित झाला आहे. (हा भक्तिभाव कधीकधी इतका परा-कोटीला जातो की श्रद्धाळू मुसलमानाच्या हातात असलेली कुराणाची प्रत आणि त्याने कुराणाचे केलेले पठण ह्याही अनिर्मित गोष्टी आहेत हा विपरीत सिद्धांत स्वीकारण्यात येतो.) मध्यवर्ती इस्लामवर जरी ग्रीक संकल्पनांचा फारसा पगडा बसला नाही, तरी इस्लामच्या पंथोपपंथांत ॲरिस्टॉटलनंतरच्या ग्रीक तत्त्वज्ञानाचा अधिक यशस्वी प्रकारे शिरकाव झाला. विशेषतः दहाव्या शतकाच्या अखेरीस 'ग्नॉस्टिक' संकल्पनांचे इस्लामीकरण करण्याचे बरेच प्रयत्न झाले.

अनुक्रमणिका

ह्या पंथांच्या सिद्धांतांची संकल्पनात्मक चौकट आणि त्यांची युक्तिवादाची पद्धती जरी सामान्यपणे ग्रीक (हेलेनिस्टिक) होती तरी त्यांचा आशय कुराण आणि इस्लामी परंपरा यांच्यापासूनच प्राप्त झालेला होता. इस्लामी गूढवादाच्या परिभाषेतही हेलेनिस्टिक संकल्पनांनी प्रवेश केला. पण इस्लामी भक्तिपंथाची जी पारंपरिक भाषा होती तिच्यात ह्या संकल्पना इतक्या चपखलपणे बसल्या की मुसलमान साधकांना त्यांच्या परकेपणाची जाणीव झाली नाही.

विज्ञानाच्या क्षेत्रामध्ये मात्र स्वकीय विज्ञाने आणि परकीय विज्ञाने हा भेद कधी लुप्त होऊ शकला नाही. ग्रीक वैज्ञानिक वारसा जरी मुस्लिम विचारवंतांनी आत्मसात केला आणि त्याच्यात भरही घातली तरीही ही गोष्ट होऊ शकली नाही. स्वकीय किंवा अरबी शास्त्रे ही मूलतः धर्म आणि भाषा यांच्याविषयीची शास्त्रे होती. धर्माविषयीच्या शास्त्रांचा विकास कुराणावरील भाष्ये, कुराणातील वचनांची चिकित्सा, हदीस, न्यायशास्त्र आणि सैद्धान्तिक देवशास्त्र ह्या शास्त्रांत झाला. भाषिक शास्त्रातून व्याकरण, शब्दकोश, अलंकारशास्त्र, साहित्यशास्त्र यांचा उद्भव झाला. परकीय शास्त्रांना प्राचीनांची शास्त्रे असेही म्हणत. इब्न तुमलुस (मृत्यू १२२३) यांनी स्वकीय आणि परकीय शास्त्रे ह्यांच्यामधील भेदाचे केलेले स्पष्टीकरण असे आहे की स्वकीय शास्त्रे ही इस्लामने स्वतः विकसित केलेली विशिष्ट शास्त्रे आहेत तर परकीय शास्त्रे ही सर्व लोकांना आणि धार्मिक जमातींना समान आहेत. परकीय शास्त्रे ही प्रामुख्याने ग्रीकांनी विकसित केलेली शास्त्रे होत. त्यांच्यात तर्कशास्त्र, गणिताच्या वेगवेगळ्या शाखा, तत्त्वमीमांसा (मेटॅफिझिक्स), प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, वैद्यक, ज्योतिष, संगीत, जादूविद्या आणि किमया (आल्केमी) या शास्त्रांचा समावेश होता.

अरब विचारवंतांनी ह्या शास्त्रांचा कसोशीने अभ्यास केला आणि त्यांच्यात भर घालण्याचे यशही संपादन केले. तरीही धार्मिक मुसलमानांची ह्या परकीय शास्त्रांविषयीची दृष्टी काही प्रमाणात संशयग्रस्त अशीच होती. किंबहुना मध्ययुगाच्या अखेरच्या पर्वात त्यांच्याविषयीची वितुष्टाची भावना बळावत गेली. हा विरोध ह्या शास्त्रांचे जे विषय होते त्यांच्यामुळे जसा होता तसाच ह्या शास्त्रांचे प्रवर्तक, आणि ज्यांची मते निर्णायक मानली जात असे अधिकारी पूर्वसूरी परकी, मुस्लिमेतर होते ह्या कारणामुळेही होता. ज्याच्यामुळे आपली श्रद्धा धोक्यात येईल अशा शास्त्राचा अभ्यास करण्याचे धार्मिक माणसांनी टाळले पाहिजे, त्यांच्या दृष्टीने शास्त्रांचे मूलभूत वर्गीकरण स्वकीय आणि परकीय शास्त्रे हे नव्हे; ते (धार्मिक दृष्ट्या) प्रशंसनीय आणि निंद्य शास्त्रे असे असले पाहिजे. इहलोकात किंवा परलोकात जी शास्त्रे निरुपयोगी असतील ती निंद्य असतात. निरुपयोगी ज्ञानापासून आपले संरक्षण करावे अशी प्रेषिताने ईश्वराची प्रार्थना केल्याचे सांगण्यात येते. ‘उपयुक्त’ ज्ञान ह्याचा सनातनी देवशास्त्रज्ञांनी जो अर्थ लावला तो धर्माच्या आचरणासाठी आवश्यक किंवा उपकारक असलेले ज्ञान असा होता. अशा रीतीने इस्लामी संस्कृतीत दोन भिन्न आणि बऱ्याच प्रमाणात परस्परांपासून स्वतंत्र असलेल्या अशा बौद्धिक परंपरा आढळतात. एक तत्त्वज्ञानात्मक-वैज्ञानिक होती, दुसरी धर्मशास्त्र-देवशास्त्रावर आधारलेली होती. ह्या दोहोत कलह होता आणि त्याची परिणती प्राचीन शास्त्रे हळूहळू हटण्यात झाली.

यादवी युद्धांमुळे इस्लामी साम्राज्याचे केंद्र प्रथम अरबस्तानातून सिरियामध्ये आणि नंतर इराकमध्ये सरकले. खलिफा हा मुस्लिम राज्याचा पालक आहे ही मूळची कल्पना होती. तिच्या जागी अब्बासिद राज्यकर्त्यांनी पद्धतशीर आणि सुव्यवस्थित शासनयंत्रणा निर्माण केली. सिरियन कालखंडाच्या अखेरीस ह्या प्रक्रियेला प्रारंभ झाला होता. ही शासनव्यवस्था ससानियन धर्तीवर संघटित करण्यात आली होती. सरकारी खाती वाढत गेली, प्रत्येक खात्याचे कार्यक्षेत्र आणि अधिकारक्षेत्र स्पष्टपणे आखून देण्यात आले आणि त्याची कार्यपद्धतीही काळजीपूर्वक नियमित करण्यात आली. दहाव्या शतकात खलिफाची शासनव्यवस्था अशा दहा खात्यांमार्फत चालत असे; खात्याला ‘दिवाण’ म्हणत. युद्धखाते, राज्याचा कोषागार, टपालखाते, दरबाराच्या खर्चाची व्यवस्था करणारे खाते, ही खात्यांची काही उदाहरणे होत. दिवाणांच्या प्रमुखांचे एक मंडळ असे आणि वझीर त्याचा अध्यक्ष असे. राज्याच्या प्रत्येक प्रदेशाचा कारभार एक लष्करी प्रमुख आणि नागरी प्रशासनाचा प्रमुख हे संयुक्तपणे चालवीत. कधीकधी ही दोन्ही कार्ये व अधिकार एकाच व्यक्तीकडे सोपविण्यात येत.

जेव्हा असे होई तेव्हा तो प्रदेश राज्यापासून अलग होऊन स्वतंत्र राज्य म्हणून नांदण्याच्या दिशेने पडलेले ते पहिले पाऊल ठरे. राज्याचे वार्षिक अंदाजपत्रक काळजीपूर्वक बनविण्यात येत असे. दहाव्या शतकात दरबारावरील खर्च वाढू लागला आणि त्यासाठी सीमेवरील किल्लेकोटांची किंवा तटबंदीची निगा राखणे, किंवा रस्तेबांधणी ह्या सार्वजनिक सेवांवरील खर्च कमी करण्यात आला. मुस्लिम साम्राज्याच्या अवनतीच्या कालखंडाला ह्या प्रक्रियेपासून सुरुवात झाली आणि ह्या अवनतीची काही कारणेही तिच्यात प्रतिबिंबित झाली होती असे म्हणता येईल. दरबारात साहित्यिकांचा व व्युत्पन्न पंडितांचा भरणा असे. प्रबोधनकाळी (रेनेसां) युरोपीय राजांच्या दरबारात ग्रीक भाषेत व विद्यांत प्रवीण असलेल्या पंडितांच्या स्थानासारखेच त्यांचे स्थान होते.

इस्लामी प्रदेशातील जनतेची पहिली निष्ठा इस्लामशी असे. ही निष्ठा जिंकून घेण्यात इस्लाम यशस्वी ठरला होता ह्यात शंका नाही. पण ह्यामुळे एक राजकीय व सामाजिक शक्ती म्हणून राष्ट्रवाद निष्प्रभ झाला नाही. अरबेतर मुसलमानांचे स्थान इस्लामी समाजाच्या संदर्भात दुय्यम, कनिष्ठ होते. पण आपल्या सांस्कृतिक कामगिरीचे आणि आपल्या पूर्वजांच्या थोर कृत्यांचे गोडवे गाऊन त्यांनी ह्याची भरपाई करण्याचा प्रयत्न केला. अरबांच्या चालीरीती आणि आचरण असंस्कृत, रासवट आहेत असा दोष ते त्यांच्या पदरी घालीत. अरबांना सर्वांत प्रखर अभिमान त्यांच्या उच्च वंशपरंपरेविषयी वाटे. तेव्हा हे अरबेतर टीकाकार अरबी टोळ्यांमध्ये मागे कधीतरी घडलेल्या भानगडींविषयीच्या कंड्या उकरून काढून ह्या वंशपरंपरेच्या शुद्धतेविषयी संशय व्यक्त करीत. अरब अर्थात ह्या आघातांचा प्रतिकार करीत. जेव्हा अब्बासीद राज्यकर्त्यांच्या दरबारात इराणी प्रभाव अधिक वरचढ ठरू लागला तेव्हा खुद्द ईश्वराच्या प्रेषिताच्या जमातीचे आपण घटक आहोत, आपल्या (अरबी) भाषेच्या संपन्नतेला जगात तोड नाही, अरबी काव्याचे सौंदर्य केवळ अतुलनीय आहे ह्या मुद्द्यांवर अरब आपल्या सर्वश्रेष्ठत्वाचा दावा आधारू लागले. ह्या बऱ्याचशा टीका–प्रतिटीकेची पातळी अर्थात बालिश होती. पण त्यांतून लोकांच्या मनात जे ढवळत होते त्याचा प्रत्यय येतो.

इस्लामी अधिसत्तेचा भंग होण्याला आठव्या शतकात प्रारंभ झाला पण नवव्या आणि दहाव्या शतकांत ह्या प्रक्रियेला वेग चढला. साम्राज्यात ज्या भिन्नराष्ट्रीय जमाती सामावलेल्या होत्या त्यांना अनुसरून साम्राज्याचे विभाग झाले. पश्चिमेला स्पेन, बर्बर उत्तर आफ्रिका आणि इजिप्त, आणि पूर्वेला इराणी प्रदेश ह्यांनी आपले स्वातंत्र्य परत मिळविले. अरबीभाषिक प्रदेशांतही सिरिया, इराक आणि अरबी द्वीपकल्प ह्या भागांत प्रादेशिक हितसंबंधांनी आपले प्रभुत्व प्रस्थापित केले. ह्या राजकीय फाळणीमुळे कायरो आणि कॉर्डोव्हा ह्या शहरांची अरबी-इस्लामी संस्कृतीची केंद्रे म्हणून गणना होऊ लागली. ह्या राजकीय विभाजनाचे निराकरण करून मूळची एकसंधता प्रस्थापित करणे इस्लामला शक्य झाले नाही. पण इस्लामी संस्कृतीच्या एकसंधतेला त्यामुळे कधी तडा गेला नाही. इस्लामी विद्वान सबंध इस्लामी प्रदेशात मोकळेपणे प्रवास करीत असत; मग राज्यकर्ते कुणीही असोत. मुत्सद्दी लोक एका राजाची चाकरी सोडून दुसऱ्याच्या चाकरीत सहजपणे प्रवेश करीत. राजकीय विभागणीवर समान श्रद्धा आणि समान शिक्षणक्रम अशा रीतीने मात करीत. इस्लामी जनतेची जशी भिन्न राज्यांत विभागणी झाली होती तशीच भिन्न धार्मिक पंथांतही झाली होती. इस्लामी जनतेत वेगवेगळे सामाजिक थरही अर्थात होते. एका राज्यात अनेक राष्ट्रीय समूह किंवा पंथ वसत असत, एक राष्ट्रीय समूह किंवा एक पंथ अनेक राज्यांत विभागलेला असे, एका पंथात अनेक सामाजिक थर सामावलेले असत किंवा एक थर अनेक पंथांत विभागलेला असे अशी गुंतागुंत होती. भिन्न इस्लामी पंथ आंतरराष्ट्रीय होते पण सामान्यपणे त्यांना कोणत्या तरी राज्यात राजकीय सत्तेचे अधिष्ठान असे आणि त्यांचे अनुयायी विशिष्ट सामाजिक थरांतून आलेले असत. उदा., कडवे शिया हे कारागीर वर्गातील असत. सुन्नी इस्लाम कुणाला पाखंडी म्हणून जाहीरपणे स्वतःतून बहिष्कृत करायला उत्सुक नसे. ह्या संदर्भात प्रेषितांचे म्हणून एक वचन उद्धृत करण्यात येत असे. ते असे की, इस्लामच्या अनुयायांत जे मतभेद होतील ती ईश्वराची कृपाच असेल. इस्लाममध्ये एकंदर ७३ पंथ उदयाला येतील आणि त्यांतील एक सोडून इतर सर्व बरोबरच असतील असेही प्रेषितांनी म्हटल्याचे सांगण्यात येत असे. धर्मशास्त्रज्ञही जरी कुणाला बहिष्कृत करावे हे नेमकेपणे मांडायला अळंटळं करीत असत तरी पाखंडीपणा खपवून









घेण्याच्या बाबतीत त्यांची वृत्ती जनसामान्यांपेक्षा अधिक कडक होती. धार्मिक पंथ अर्थात काटेकोर असत. आपले अनुयायीच काय ते खरे सश्रद्ध मुसलमान होत असे ते मानीत. गझाली यांनी फलासिफांना (तत्त्ववेत्त्यांना) मुसलमान जमातीतून बहिष्कृत केले होते. पण मुताझिल आणि इतर अनेक पंथ ह्यांना बहिष्कृत करणे योग्य ठरेल की नाही ह्याविषयी त्यांचे मत डळमळीत होते. कारण त्यांची अनेक मते चूक असली तरी सत्य सिद्धांतांच्या विरुद्ध नव्हती, त्यांच्यापासून काहीशी दूर होती असे त्यांना आढळून आले. शिवाय इतर बाबतींत सत्य सिद्धांतांचा स्वीकार करून त्यांनी आपल्या चुकांची भरपाई केली आहे असेही त्यांचे मत झाले. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे कुराणात जो नियम आढळतो तो एवढाच की इस्लामच्या प्रेषिताला जो नाकारील त्याला बहिष्कृत करावे. ह्या संदर्भात एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. जिचा निर्णय सर्व मुसलमानांवर बंधनकारक आहे अशी संस्था किंवा एखादे मंडळ इस्लाममध्ये नाही. पण विशिष्ट प्रसंगी धर्मशास्त्रज्ञांचे एखादे मंडळ एखाद्या माणसाला तो पाखंडी आहे ह्या कारणासाठी देहांताची शिक्षा द्यायचा अधिकार राज्यकर्त्यांना देत असे. राज्य उलथून टाकण्याचा प्रयत्न करणारे पाखंडी पंथ अर्थात शिक्षेला पात्र असत. पण ते सोडले तर अद्वैताचा पुरस्कार करणाऱ्या इस्लाममधील पंथांना पाखंडी म्हणून शिक्षा होण्याचा सर्वांत जास्त धोका असे.

कोणत्याही कालखंडातील साहित्य घेतले, तर त्याच्यात अनुभवाचा जो आविष्कार झालेला असतो त्याला दुहेरी मर्यादा असते. अनुभवाच्या काही अंगांना महत्त्व देणारे आणि इतर अंगांकडे दुर्लक्ष करणारे असे काही संकेत समाजात प्रचलित असतात. शिवाय परंपरेने जे साहित्यप्रकार, प्रतिमा, शैली व्यक्तींना उपलब्ध असतात त्यांचीही मर्यादा त्यांच्या वैयक्तिक अभिव्यक्तीला पडत असते.

ग्रीक आणि लॅटिन साहित्यांप्रमाणेच अरबी साहित्यही विशिष्ट साहित्यप्रकारांची भिन्न स्वरूपे आणि प्रत्येक साहित्यप्रकाराला आधारभूत असलेले अंतर्गत नियम आणि संकेत ह्यांच्याविषयी अतिशय जागरूक आहे. पण ग्रीक आणि लॅटिन साहित्याच्या तुलनेने अरबी साहित्यात वाङ्मयप्रकारांची विविधता कमी आहे. नाटक आणि महाकाव्य (एपिक) हे प्रकार अरबी साहित्यात विकसित झालेच नाहीत. गद्यापेक्षा काव्य श्रेष्ठ मानले जाते. (ह्याविषयी मतभेद व्यक्त करणारे तुरळक साहित्यशास्त्रज्ञ असले तरी सर्वसाधारणपणे हे मत मान्य होते.) गद्य लिहिण्यापेक्षा काव्य लिहायला अधिक कौशल्य लागते ह्या समजुतीवर हे मत आधारले होते. विशिष्ट वाङ्मयप्रकाराच्या उत्कृष्टतेचे जे पारंपरिक दंडक आणि नियम होते त्यांचे पालन झालेच पाहिजे असा रसिकांचा आग्रह असे. सर्वसाधारण समीक्षकाचा तर असा विशेष आग्रह असे. (व्याकरण आणि शब्दकोश यांचे अध्ययन केल्यानंतर विद्यार्थी साहित्यशास्त्राकडे वळे.) उदा., 'कशिदा' हा एक काव्यप्रकार आहे. त्याची रचना ठरीव पद्धतीने करावी लागे. प्रारंभी कवी भूतकालातील एखाद्या प्रेमप्रकरणाचे स्मरण करी; ते जेथे घडले आणि जेथून कवी परागंदा झाला त्या स्थळाचे वर्णनही आले तर उत्तमच; नंतर स्वतःचे सांत्वन करण्यासाठी कवी एका उत्कृष्ट उंटावर स्वार होऊन वाळवंटातून संकटांनी ग्रासलेल्या प्रवासाला निघे; आणि शेवटी तो एखाद्या राजाला किंवा सरदाराला उद्देशून काही विनंती करी, किंवा स्वतःच्या टोळीची किंवा स्वतःची स्तुती करी किंवा कोणत्यातरी राजकीय समस्येवर आपल्या गटाचा प्रवक्ता म्हणून काही भाष्य करी. सबंध मध्ययुगातील काव्यात प्रेषितापूर्वीच्या अभिजात अरबी काव्याची परंपरा मुख्यत्वेकरून जोपासली गेली. ही प्रथा बाराव्या शतकापर्यंत चालली. पण फारसी आणि ग्रीक साहित्यांचा अरबी साहित्यावर प्रभाव पडल्याशिवाय राहिला नाही.

नगरे आणि नागरी वसाहती ही इस्लामपूर्व अरबी संस्कृतीची खरी केंद्रे होती. पण तत्कालीन अरबी साहित्य वाळवंटातील भटक्या बदाऊन टोळ्यांच्या मूल्यांना आणि आदर्शांना वाहिलेले होते. ह्या वाङ्मयीन परंपरेचे प्रामाण्य प्रस्थापित झालेले असल्यामुळे इस्लामी काव्यातही मरु-भावकविता (डेझर्ट लिरिक्स) हा काहीसा विसंवादी साहित्यप्रकार टिकून राहिला. आबासीद राजवटीच्या प्रारंभीच्या कालखंडात इस्लामी काव्याला लक्षणीय बहर आला. राजदरबारातला रंगीबेरंगी उल्हास, स्वच्छंदी, दुराचाऱ्याची पश्चात्तापाची भावना आणि तिच्या अनुषंगाने येणारे नैतिक चिंतन, आणि प्रेयसीविषयी आराधनेचा भाव बाळगणारी अत्यंत तरल अशी प्रेमभावना यांचा समर्थपणे आविष्कार करणारे साहित्यकार निर्माण

करण्यात आले. प्रेमाची ही संकल्पना स्पेनमधून फ्रेंच शाहीरांच्या (ट्रूबॅडूर) काव्यात प्रविष्ट झाली आणि तिच्याबरोबर स्पॅनिश अरबांच्या आवडीचे काही गुंतागुंतीचे छंदही त्यांनी उचलले. परंपरावादी कवींनी चालत आलेल्या चौकटीचा स्वतःच्या भाषिक पटुत्वाचे डौलदार प्रदर्शन करण्यासाठी वापर केला तर आधुनिकतावादी कवींनी नवीन हलकेफुलके चपळ छंद निर्माण केले. राजदरबाराचा आणि साम्राज्यातील सरदारदरकदारांचा आश्रय कवींना मिळाल्यामुळे ते सत्ताधीशांचे प्रवक्ते बनले. अनेकदा त्यांची आर्थिक स्थिती सुधारली आणि सामाजिक दर्जा उंचावला. ह्यामुळे कवींचा लाभ झाला तरी काव्याची हानी झाली. सत्ताधाऱ्यांची स्तुती करण्यात (किंवा त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांची निंदा करण्यात) काही ताळमेळ राहिला नाही. ठरीव भावनांचा आणि आकांक्षांचा आविष्कार काव्यात होत राहिल्यामुळे त्यांचीच अभिव्यक्ती करण्यात अगोदरच्या कवींवर कडी करण्याची आवश्यकता प्रत्येक कवीला भासे. शिवाय प्रस्थापित वाङ्मयीन अभिरुचीला अनुसरून कवीला काही मर्यादित विषयच उपलब्ध असत. परिचित विषय, भावना, अलंकार यांची यशस्वीपणे पुनर्मांडणी करण्यात कवीची मौलिक प्रतिभा दिसून येते असा समज होता. ह्यामुळे मध्ययुगाच्या उत्तरार्धात सर्जनशीलता हळूहळू क्षीण होत गेली आणि काव्यातील शब्दचमत्कृती आणि अर्थचमत्कृती यांत पूर्वी जो चमकदारपणा होता तो मंदावत गेला. फक्त गूढवादी काव्यात कवीचे सर्जनस्वातंत्र्य सुरक्षित राहिले. कारण जो अनुभव कवीला व्यक्त करायचा असे त्याच्या उत्कटतेमुळे त्याच्यावर प्रस्थापित संकेतांचे दडपण पडणे कठीण असे. गूढवादी काव्याला साहित्यिक परंपरावादापासून धोका नव्हता. त्याला धोका होता तो दुर्गम्यतेचा होता.

अरबी अभिरुची एका विशिष्ट वळणाची होती. सबंध काव्याची रचना उत्कृष्ट असावी ह्यापेक्षा एकेक ओळ किंवा कडवे किंवा श्लोक शक्य तितका सुरेख, चमकदार असावा ह्यावर तिचा भर असे. गद्यामध्येसुद्धा विस्ताराने केलेल्या कथनापेक्षा एखादा चुटका, आख्यायिका ह्यांचे त्यांना आकर्षण असे. लोकप्रिय ठरलेल्या गद्यात ह्याहून अधिक विस्तृत कथन आढळते. पण त्यातील कथासुद्धा फुटकळ प्रसंगांची सैल मालिका ह्या स्वरूपाच्याच असतात.

सबंध साहित्यकृतीची योजना करून तिची काळजीपूर्वक रचना करणे हे इराणी साहित्यिकांचे वैशिष्टच होते. इराणची इतिहासलेखनाची परंपरा होती. तिचा विकास करून ह्या साहित्यिकांनी महाकाव्याची एक थोर परंपरा घडविली. इराणचा इतिहास, त्यानंतर काल्पनिक कथा, नंतर गूढवादी अनुभव हे कालानुक्रमे ह्या काव्यांचे लोकमान्य विषय होते. कर्बाला येथे हुसेनच्या झालेल्या मृत्यूच्या प्रसंगावर केंद्रित झालेले धार्मिक नाटचवाङ्मयही इराणमध्ये निर्माण झालेले होते. सर्जनशील कल्पनाशक्ती आणि अलंकारिक, प्रतिकात्म भाषेच्या धुंदीत रममाण होण्याची प्रवृत्ती ह्यांत इराणी लोक अरबांवर ताण करीत असे दिसते. परंतु मूलतः इराणी अभिरुची ही अरबी अभिरुचीच होती. मध्ययुगीन युरोपिअन अभिरुचीशी एकंदरीत जुळणारी अशी ही अभिरुची होती. पारंपरिक साहित्यशास्त्राचे प्रामाण्य ती शरणपूर्वक स्वीकारीत असे. विशिष्ट प्रसंग आणि अनुभव यांतून प्राप्त होणारे बौद्धिक सिद्धांत स्पष्टपणे मांडण्याची तिला हौस असे. साहित्याची शैली आणि आशय विद्वत्ताप्रचुर असत. तंत्रावर भर असे. भरजरी पोत, तपशीलवार वर्णने तिला रुचत असत. आणि सर्वांत म्हणजे जे विचित्र, लोकविलक्षण आणि म्हणून जिज्ञासेला चाळवणारे असे त्याचे तिला आकर्षण असे. मुस्लिम कवीची आकांक्षा रसिकाला चकित करण्याची असे. मध्ययुगातील युरोपिअन कवीप्रमाणे वाचकात नवलाची, आश्चर्याची भावना जागृत करण्याचा त्याचा प्रयत्न असे. प्रतिमा आणि सुभाषिते ह्यांच्या साहाय्याने काव्यात हा परिणाम साधला जाई. गद्यात मधूनमधून विषयाला सोडून स्वतंत्रपणे केलेले विवेचन, नवलकारक गोष्टींची वर्णने आणि एका विषयापासून दुसऱ्या विषयाकडे अचानकपणे घेतलेले वळण यांचा त्यासाठी वापर करण्यात येई. वाचकाचे लक्ष मंदावू नये ह्यासाठी सर्व उपाय वापरण्यात येत. एकाच विषयावर बराच काळ लक्ष केंद्रित करण्याची वाचकाचीही इच्छा नसावी असे दिसते. ह्यामुळे श्रेष्ठ गद्यलेखकांच्या साहित्यामध्येही एका प्रसंगाकडून चटकन दुसऱ्या प्रसंगाकडे वळण्याची प्रवृत्ती आणि सुसंगत, एकात्म रचनेचा अभाव ह्या गोष्टी आढळून येतात. ह्या मार्गाचा अवलंब केल्याशिवाय तरणोपाय नाही अशी त्यांची धारणा असणार.

९ व्या आणि दहाव्या शतकांतील लेखकांनी ऐतिहासिक व्यक्ती आणि प्रसंग यांचे प्रत्ययकारी वर्णन करण्यात विशेष यश मिळविले. ह्या लिखाणामुळे माणसांविषयीचे मानसशास्त्रीय कुतूहल अधिक सखोल झाले यात शंका नाही. पण हे मानसशास्त्रीय चित्रण सरळ, साधे असे. त्यात विशेष चिंतनशीलता नव्हती. सभ्यतेची जी मुस्लिम कल्पना होती– जी अजूनही टिकून आहे– तिच्यात इतरांविषयी बोलताना एक मर्यादा पाळली पाहिजे हा आग्रह असे. गुह्य गोष्टी गुह्य राखल्या पाहिजेत अशी भावना होती. ह्यामुळे साहित्यात माणसाच्या मनाचे आणि वर्तनाचे सर्वांगीण आणि सखोल विश्लेषण करण्याला प्रतिबंध होई. ग्रीक साहित्यात आणि आधुनिक युरोपीय साहित्यात माणसांची ज्या प्रकारची, मानसशास्त्राच्या दृष्टीने समाधानकारक ठरतील अशी चरित्रे आढळून येतात तशी मुस्लिम साहित्यात आढळून येत नाहीत. असे असले तरी इस्लामी साहित्यात चरित्रांचा जो संग्रह आढळतो तो आश्चर्यकारक ठरावा इतका समृद्ध आहे. राजकीय आणि सांस्कृतिक इतिहासाची सामग्री अशा रीतीने जतन करण्यात आली आहे. ह्या संग्रहाशी ज्याची दुरूनही तुलना करता येईल असे मध्ययुगीन युरोपात काहीच आढळत नाही. मुस्लिम लेखक भावनांचे निरीक्षण जागरूकपणे आणि उत्कट कुतूहलाने करीत असे. पण ते धार्मिक साहित्यात, पापी माणसाला झालेल्या उपरतीच्या वर्णनात किंवा कदाचित एखाद्या ऐतिहासिक घटनेच्या कथनात प्रतिबिंबित होई. ह्या निरीक्षणाचा लाभ फक्त भक्तिपर साहित्याला झाला आहे.

चौदाव्या आणि पंधराव्या शतकांत मुस्लिम साहित्य, इतिहास इत्यादींच्या अध्ययन-अध्यापनाचे पुनरुज्जीवन झाले. पांडित्य सर्जनशील असले पाहिजे, पारंपरिक वारशात नवी भर घालण्याची क्षमता त्याच्यात असली पाहिजे हा आग्रह ह्या पुनरुज्जीवनात आढळून येतो. तथापि साहित्याची अवनती होण्याच्या कालखंडात जे वाङ्मय निर्माण झाले होते त्यातील बहुसंख्य कृतींच्या अनुरोधाने ह्या साहित्यशास्त्राने आपले कार्यक्षेत्र आणि पद्धती निश्चित केली होती. ह्या संदर्भात अल्‌मावी (मृत्यू १५७३) यांनी पूर्वीच्या एका साहित्यशास्त्रज्ञाचे उद्‌धृत केलेले मत असे आहे :

" साहित्यसेवेचे सात प्रकार आहेत : (१) नवी रचना करणे; (२) विशिष्ट साहित्यकृतीत जे दोष असतील ते सुधारणे; (३) विशिष्ट साहित्यकृतीत ज्या चुका झाल्या असतील त्या दाखवून देणे; (४) विशिष्ट साहित्यकृतीत अतिरेकी संक्षेपामुळे जे भाग समजायला कठीण असतील त्यांतील अडचणींचे स्पष्टीकरण करणे; (५) जे भाग दीर्घ आणि कंटाळवाणे असतील त्यांचा त्या सबंध साहित्यकृतीच्या आकलनात विक्षेप येणार नाही अशा रीतीने संक्षेप करणे; (६) साहित्यकृतीच्या ज्या भागांची वाईट रचना झालेली असेल त्यांची, तिच्या मूळ रचनेला कमीत कमी धक्का बसेल अशा रीतीने, योग्य प्रकारे पुनर्रचना करणे; (७) पूर्वसूरीच्या एखाद्या विशिष्ट कृतीत तिच्यातील सामग्रीची जेथे वाईट प्रकारे रचना झाली असेल अशा स्थळांची कल्पकतेने पुनर्रचना करून त्या साहित्यकृतीपासून लोकांना सुलभतेने धडे घेता येतील असे रूप तिला देणे.

इस्लाम-पूर्व अरबस्तानात काव्याशिवाय इतर कोणत्याही कलेचा विकास झालेला नव्हता. जिच्यावर नवीन बांधणी करता येईल अशी ललितकलांची मूळची परंपरा इस्लामला उपलब्ध नव्हती. तेव्हा "इस्लामी देशांत ज्या कला आहेत त्या, अरबांनी त्यांना जिंकण्यापूर्वी त्यांच्यात ज्या ग्रीक-रोमन परंपरा नांदत होत्या त्यांच्यापासून प्राप्त झालेल्या आहेत. कधीकधी हा प्रभाव सरळ, साक्षात झालेला दिसून येतो; इतर वेळी ससानियन (इराणी) आणि कॉप्टिक कलापरंपरांच्या द्वारा तो झालेला असतो; ह्याशिवाय भारतासारख्या देशाकडून आलेल्या बाह्य प्रभावाचे अस्तित्वही जाणवते."

इस्लामच्या धार्मिक विधीमध्ये जे उग्र गांभीर्य आणि साधेपण आहे ते इस्लामने कधी गमावले नाही. तेव्हा मशिदीच्या कोषागारांसाठी सोन्याचांदीच्या वस्तूंवर कलाकुसरीची कामे करण्यासाठी कारागिरांना उत्तेजन लाभत नसे. वास्तुकलेला एऱ्हवी जो बहर आला असता त्याच्यावरही ह्यामुळे मर्यादा पडली. प्रारंभी मशीद ही साधेपणे रचलेली अनलंकृत अशी इमारत असे. अरब देशांत मशिदीपेक्षा तिचे प्रांगण हे अधिक मोठे असे, प्रार्थनेपूर्वी शरीराचे अवयव धुण्याचा जो विधी आहे त्याच्यासाठी कारंज्याची सोय ह्या उघड्या प्रांगणात असे. प्रार्थनेची बांग ज्याच्यावरून देण्यात येते तो मनोरा हे मशिदीच्या इमारतींच्या समूहाचे लक्षवेधक वैशिष्ट्य असे. आतल्या भिंतींना एक तर फक्त

अनुक्रमणिका

सफेद रंग फासलेला असे; नाही तर कुराणातील वचने आणि प्रेषित व धार्मिक वर्तनाचे आदर्श घालून देणारे प्रारंभीचे खलिफा यांची नावे त्यांच्यावर लिहिलेली असत. ज्या अक्षरावलीत ही वचने व नावे लिहिलेली असत ती बुट्टीदार असे व त्यामुळे भिंतींना शोभा येई. अनेकदा ही अक्षरावली संगमरवरी किंवा इतर प्रकारच्या फरशांच्या गुळगुळीत पृष्ठभागावर लिहिलेली असे. रिकाम्या दालनांना संकुचित न करता त्यांतील कठोर शांततेला सौम्य करण्याचे कार्य ह्या फरशांचे मृदू रंग आणि त्यांवरील वेलबुट्टी करीत असे. आशियाच्या ह्या भागात जिवंत प्राण्यांची चित्रे काढण्याला किंवा त्यांच्या प्रतिकृती करण्याला प्रतिकूल अशी वृत्ती प्राचीन काळापासून होती. ह्या प्रदेशात वेगवेगळ्या काळांत नांदलेल्या भिन्न संस्कृतींत ही वृत्ती आढळून येते. इस्लाममध्ये ही वृत्ती स्पष्टपणे प्रकट झाली आहे. प्रेषितांचे एक वचन वारंवार निर्दिष्ट करण्यात येते. निर्णयाच्या दिवशी चित्रकाराला किंवा मूर्तिकाराला आपल्या कलाकृतीत प्राण फुंकून त्यांना तू जिवंत कर अशी आज्ञा करण्यात येईल आणि तसे करायला तो असमर्थ ठरला तर आगीत जळण्याची शिक्षा त्याला देण्यात येईल अशा अर्थाचे हे वचन आहे. प्रारंभीच्या आणि अधिकृत इस्लाममध्ये संत असे कुणी नाहीत. ह्यामुळे चित्रकाराला ऐहिक वस्तू आणि प्रसंग ह्यांच्यावर लक्ष केंद्रित करणे भाग पडले असते. जिवंत वस्तू 'निर्माण' करण्याच्या औद्धत्याच्या किंवा अधिकारातिक्रमणाच्या आरोपापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी मुस्लिम कलाकार प्राण्यांसारखी हुबेहूब चित्रे न काढता विसदृश चित्रे काढीत असे. ग्रंथ सुशोभित करण्यासाठी चित्रे काढताना विशेषतः इराणी चित्रकार इस्लामी इतिहासातील आणि प्रेषिताच्या जीवनातील प्रसंगांची चित्रे काढायला अनमान करीत नसे. कधीकधी प्रेषितांचे चित्र काढण्याचेही धाडस तो करीत असे. परंतु, लघुचित्रकलेचा (मिनिएचर) जरी सुरेख विकास झाला तरी धार्मिक आदेशावर आधारलेल्या पूर्वग्रहामुळे चित्रकला कुंठित झाली आणि मूर्तिकला पूर्णपणे वर्ज्य झाली. वास्तुकला, तसेच अक्षररेखन-कलेसारखी (कॅलिग्राफि) 'गौण' कला हीच मुस्लिम कलावंतासाठी आत्माविष्काराची क्षेत्रे म्हणून मोकळी राहिली. वस्तूची प्रतिकृती, प्रतिमा, प्रतिबिंब निर्माण करण्याऐवजी वस्तूंना सुशोभित करणे हे कलेचे उद्दिष्ट ठरले. रिकाम्या जागेच्या भीतीतून भिंतीवर, हस्तलिखितांत, फुलदाणीच्या पृष्ठभागावर उपलब्ध असलेली जागा बहरलेल्या वेलबुट्टीच्या साहाय्याने अलंकृत करण्यात येऊ लागली. ह्या वेलबुट्टीत हरतऱ्हेचे आकार शिताफीने आणि प्रयासाने एकमेकात गुंतविलेले असत, प्रारंभ आणि शेवट एकजीव झालेले असत, आणि कुराणातील वचने व वक्र रेषा ह्यांचा एकमेकांशी बेमालूमपणे सांधा जुळविलेला असे. ह्या अलंकाराला कोणताही बौद्धिक अर्थ नसे. अलंकृत मशिदीचे उग्र-गंभीर स्वरूप कायम राहिले पण तिचे साधेपण हरवले. तिच्या वास्तूच्या रचनेची स्पष्टता संदिग्ध व्हावी अशा रीतीने तिच्या अलंकाराची योजना केलेली असे. इस्लामी काव्य ज्याप्रमाणे त्याच्या मूळच्या अभिजात साहित्यशास्त्रापासून दूर सरकले त्याप्रमाणे इस्लामीकलाही तिच्या मूळच्या अभिजात प्रेरणेपासून दूर सरकली.

(अपूर्ण)



## अक्षरवेध

**मूर्तिभंजन** ( काव्यसंग्रह ) – यशवंत मनोहर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे–३०; १९८५; पृ. १२७; किं. ३० रुपये.

' मूर्तिभंजन ' हा यशवंत मनोहर यांचा ' उत्थानगुंफा ' ( १९७७ ) नंतर आठ वर्षांनी प्रकाशित झालेला दुसरा काव्यसंग्रह आहे. यशवंत मनोहरांची ' उत्थानगुंफा ' मधील कविता ही सामाजिक बांधिलकी उघडपणे स्वीकारणारी कविता आहे. समाजवास्तवाचे यथार्थ दर्शन घडवीत असतानाच जनमनाची आंदोलने रेखांकित करणे, आर्थिक, सामाजिक बंधनाच्या जाचक चौकटी मोडणे या मनोहरांच्या ' उत्थानगुंफा ' मधील कवितेमागच्या प्रेरणा आहेत. आर्थिक व सामाजिक असा दुहेरी पदर असलेली विद्रोहाची कमालीची तीव्र, अणकुचीदार जाणीव ही त्यांच्या ' उत्थानगुंफा ' पर्यन्तच्या कवितेची प्रमुख प्रेरणा आहे. ' मूर्तिभंजन ' संग्रहातील कवितेमागची प्रेरणा व तिची प्रकृती-प्रवृत्ती मात्र यापेक्षा बरीचशी वेगळी आहे. ती एकरंगी नसून अनेकरंगी, संमिश्र स्वरूपाची आहे. आजपर्यंतच्या काव्यप्रवासात अदृश्य राहिलेले स्वत:चे व्यक्तिमत्त्व, व्यक्तिगत जीवनानुभव न्याहाळणे व कवितेतून आविष्कृत करणे ही या कवितांमागची प्रमुख प्रेरणा आहे. त्या अर्थाने ती बरीचशी आत्मनिष्ठ, आत्मपर, खाजगी जीवनानुभव व्यक्त करणारी कविता आहे. ' मूर्तिभंजन '-मधील अनेक कवितांमधून मनोहर स्वतःच्या भावविश्वाचा, अंतर्मनाचा वेध घेताना दिसतात. त्यातील अंतरंगाचे दर्शन घेण्याचा प्रयत्न करतात. मनोहरांच्या कवितेचे हे नवे स्वरूप, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे हे अव्यक्त रूप ' मूर्तिभंजन 'मध्ये पाहायला मिळत असल्याने या संग्रहाने त्यांच्या काव्यवाटचालीतील वेगळा टप्पा निश्चित केला आहे असे म्हणता येते.

' मूर्तिभंजन 'मधील जवळजवळ अर्ध्याअधिक कविता या प्रेमानुभवाशी निगडित असलेल्या कविता आहेत. या कविता प्रेयसीला संबोधून लिहिलेल्या असल्या तरी प्रणयाची अथवा प्रेयसीच्या रूपविभ्रमांची, व्यक्तिमत्त्वाची लोभस चित्रे गुंफणे, लैंगिक अनुभवांचे मांसल चित्रण करणे हे या कवितांमध्ये अभावानेही आढळत नाही. मराठीतील अधिकांश प्रेमकविता याच वर्तुळात घुटमळणारी आहे. मनोहरांच्या प्रेमकवितांचे वैशिष्ट्य हे की, या कवितांच्या केंद्रस्थानी असलेला विवक्षित गाभा हा जीवनाच्या दुःखमयतेची व शोकात्मकतेची जाणीव करून देणारा आहे. याचे कारण मनोहरांचा स्वत:शी व स्वत:भोवतीच्या जगाशी जो सतत, अव्याहत संघर्ष चालू असतो यात आहे; तसेच ते स्त्री ही आधी माणूस आहे, या पुरुषप्रधान संस्कृतीत तिची अवस्था अधिकच बिकट आहे या जाणिवेतही आहे. म्हणूनच मनोहर स्त्रीकडे सर्वप्रथम माणूस म्हणून पाहतात व नंतर प्रेयसीच्या रूपात. तिच्या व्यक्तिमत्त्वालाच पिचून काढणाऱ्या समाजवास्तवाची जाण असल्यामुळेच मनोहर एके ठिकाणी म्हणतात,

> आणि तूच हंबरतेस रडवेली काळोखभर
> जसा कल्पांत उभा तुझ्या दूरस्थ सर्वस्वात.

इथे ' हंबरतेस ' या एका शब्दातून कवीने स्त्रीच्या आजच्या विषम समाजातील पशुवत अवस्थेचे वर्णन केले आहे. व्यक्तीचे अंतर्विश्व, भावविश्व व तिचे खरोखरीचे, प्रकट जीवन यांच्यातील अंतर्विरोधी ताणांच्या विणीतून मनोहरांची ' मूर्तिभंजन ' मधील प्रेमकविता आकाराला आली आहे. व्यक्तीच्या जीवनस्पंदनातील सूक्ष्मातिसूक्ष्म छटांचे पीळ जसे तिच्यातून पाहायला मिळतात तसेच या कवितांमध्ये जी नायिका आहे तिच्या व्यक्तिमत्त्वाचे अनंत गहिरे रंग, तिचे ' विझू विझू अंतराळ ' ही पहायला मिळते. तिचे हे व्यक्तिमत्त्व कवीला काही वेळा निराश, उदासीन करत असले तरी ते कवीला संघर्षाची प्रेरणाही देते. नायिकेचे हे व्यक्तिमत्त्व व ही प्रेरणा पुढील ओळींमधून फार प्रत्ययकारितेने व्यक्त झाली आहे–

कदाचित माझा तिरडीवरला प्रवास
सुरू असताना येशीलही
कदाचित पत्रांच्या फांद्यांना बिलगून
आकांत मांडशीलही
हवी तेव्हा धरती फाटलीच नाही तर
आकाशाच्या राखेचे घर बांधशीलही
कदाचित...
अवसेला डोळ्यांचेही कोळसे झाले
तर पाचोळा पेटवून देशीलही.

एके ठिकाणी मनोहरांनी प्रेयसीला 'विषण्णतेची छांदसी' म्हटले आहे. विषण्णतेची ही ठसठसती, दुखरी किनार संग्रहातील सर्वच प्रेमकवितांभोवती आहे. 'जीव झाला रानभरी', 'माझा प्रारंभच ठेचाळला रक्तसमुद्राला', 'जखमांची सवय होत नाही क्षितिजांना' या कवितांमधून तर अतिशय नाजूक, पारदर्शक व विलक्षण गुंतागुंतीचा भावनाशय उफाळून येताना दिसतो. 'आता तू जपायला हवीस' या कवितेत भावनांचा चिंब करणारा हळुवारपणा व कातरता आहे. 'लाखदा वाटले फेकून द्यावीत' किंवा 'ओततो सागरामागून सागर' सारख्या कवितांमधून मनोहर विलक्षण संवेदनाग्राही भावचित्रे रेखाटतात.

'तू हिरवा चाफा' ही सगळा प्रेमानुभव एकाच प्रतिमेत केन्द्रित करणारी प्रतिमारूप कविता आहे. हिरव्या चाफ्याच्या प्रतिमेभोवती अनुभूतीचे अनेक आत्मनिष्ठ संदर्भ फिरताना दिसतात व या संदर्भांमधूनच कवितेचा आशय हळुवारपणे विस्तारत जातो. उदाहरण म्हणून पुढील ओळी पहा—

हिरवा चाफा
माझ्या डोळ्यांच्या यमकात मेघमल्हार
आयुष्यभर
तू चाफा देत फांदी
आणि दर क्षणी नवा भुकेला जन्म मी
जिंदगीच्या अंतराळभर हेच अभंग चित्र
हिरव्या चाफ्याचे झाड
आयुष्यभर संगीत फांद्यांचा भार.

अतिशय नाजूक शब्दकळा लाभलेल्या या कवितेत मधेच येणारा 'प्रमोशन' हा शब्द मात्र खटकतो. लयीचा तोलच त्यामुळे ढासळतो. 'मी आयुष्य निःश्वासांच्या हवाली केले', 'दुःख खात असते' इत्यादी प्रेमकवितांवर उदासपणाची, विषण्णतेची छाया आहे. खरे तर मनोहरांच्या सर्वच प्रेमकवितांवर ती कमी-अधिक प्रमाणात दिसते. याचा प्रत्यय जिला मनोहरांची मध्यवर्ती प्रेमकविता म्हणता येईल त्या 'तू परदेशी पौर्णिमा अंजिरी' या कवितेतील पुढील ओळींमधून प्रकर्षाने येतो—

ओठ मिटून किती प्यावी ही दुःखाची झड
डोळ्यांना नाही विराम
"आमुचे डोळे दुःखाचे
ओठ मिटूनी प्यायाचे"

संग्रहातील प्रेमकवितांमध्ये सतत दिसणारा व्यथेचा, वेदनेचा प्रवासच जणू इथे कवीने सूचित केला आहे. 'माझ्या स्वप्नांच्या स्मशानलीळा', 'उरभर होणारे निर्णायक स्फोट', 'जीवनाची साधना होऊन बसते मरणाची आराधना', 'माझ्या डोळ्यांतले हे खोदकाम हा आठवणींचा अजिंठा' अशी मधूनच दिसणारी अनोखी शब्दकळा या व्यथेला, वेदनेला अधिकच घनदाट करते. मनोहरांच्या प्रेमकविता प्रेमानुभवातील कोमल, हळुवार भावनेचे फार नितळ दर्शन घडवितात.

मनोहरांचे कविमन हे जसे एकीकडे अंतर्मुखतेने अथांग मनाचा खोल ठाव घेणारे आहे तसेच ते दुसरीकडे बहिर्मुखतेने समाजवास्तव न्याहाळणारेही आहे. त्यातूनच मग कधी वैफल्यतेची जाणीवही निर्माण होते. वैफल्याच्या या जाणिवेमुळेच 'तू देतीस हात तर कदाचित ऋतुपालट झालाही असता' असे म्हणणारा कवी निराश होऊन म्हणतो—

अजून शक्य होत नाही तुला विसमरून जगणे
खिन्न निष्पर्ण आभाळाला अजून
फुटत नाहीत नवी नक्षत्र-पाने
बदलविता येत नाही रक्ताचा रंग
बदलविता येत नाहीत रस्त्यावरच्या दिशा
बदलता येत नाहीत आकांताने
रक्तात बांधलेली कडेकोट घरे.

मनोहरांचे हे वैफल्य दुहेरी आहे. ते जसे वैयक्तिक अनुभवांतून आलेले आहे तसेच आर्थिक, सामाजिक शोषणाचा, विषमतेचा संदर्भ असलेलेही आहे. वर्तमान समाजसंदर्भाचे, व्यक्तीच्या संघर्षशील जीवनातील गुंतागुंतीचे नेटके भान मनोहरांना आहे याची साक्ष संग्रहातील, ज्यांना स्थूलपणे सामाजिक जाणिवेच्या कविता म्हणता येतील त्यांत मिळते. 'इथे भिजले, तिथे रुजले' कवितेत मनोहर म्हणतात—








इथे भिजले तिथे रुजले कुठे निजले रक्तात
शिणत कण्हत झाडवाटे पोटे घेऊन हातात
ज्या रक्तावर रक्त सांडले त्याला कोण बोलू देईल
निघून चालल्या झाडांसाठी कोण इथे न्याय होईल
उगवताना गोठतो दिवस येतेवेळी रात्र रडे
दबा धरून मृत्यू मागे सरणे उभी पुढे

इथे सर्वसामान्य माणसाच्या व्यथेला, वंचित आयुष्यालाच त्यांनी व्यक्त केले आहे.

'माझ्या देशा–' या दीर्घकवितेत मनोहरांनी सद्यकालीन देशस्थितीचे चित्र रेखाटले आहे. शोषित समाजातील सर्वसामान्यांच्या स्पंदनांना ही कविता अभिव्यक्ती देते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर एवढा काळ लोटला तरी त्यांच्या दुःखभाराने पिचलेल्या आयुष्यात कुठलेही परिवर्तन घडलेले नाही या वस्तुस्थितीचे चित्रण तिच्यात आहे. 'कवटाभर वर्षांपासून हे कबंध दारात' या कवितेतही शोषितांच्या अभावग्रस्त जीवनाचे चित्रच पाहायला मिळते.

'मूर्तिमंजन' संग्रहातील 'बोलवाया आले अनोळखी स्वप्न' सारख्या अभंगरचनाही उल्लेखनीय आहेत. समाजवास्तवातील अनुभवांना, शोषित जीवनाला अभिव्यक्त करताना कवीला संतकवींच्या अभंगांचा घाट जवळचा वाटणे स्वाभाविकच म्हटले पाहिजे. कारण परंपरेने अभंगांचे अशा अनुभूतीशी निकटचे नाते आहे. 'जिथे थांबला दिवस' ही अशीच एक लक्षणीय अभंगकविता आहे.

आशयाच्या किंवा रचनेच्या बाबतीत कुठलाही साचा समोर न ठेवता जाणिवेचा मुक्त शोध घेत जाणारी मनोहरांची 'मूर्तिभंजन'मधील कविता आहे. त्यातून व्यक्त होणारा आशय नव्या वास्तवाचे, आधुनिकतेचे भान असणारा आहे. असे असले तरी 'मूर्तिभंजन' काव्यरसिकांना दीर्घकाळ आठवत राहील तो त्यातील प्रेमकवितांमुळेच.

**–अविनाश सहस्रबुद्धे**














# वाद्–संवाद्

संपादक नवभारत यांस

स. न. वि. वि.

नवभारताच्या नोव्हेंबर १९८७ च्या अंकात माझ्या 'भाषांचे वर्गीकरण व आर्यांचे मूलस्थान' या लेखावर श्री. विश्वनाथ खैरे यांचे पत्र आले आहे. त्याबद्दल माझे म्हणणे असे–

(१) "फार थोड्या उदाहरणांवरून फार व्यापक आणि विपर्यस्त निष्कर्ष काढले आहेत."

हे 'व्यापक व विपर्यस्त निष्कर्ष' कोणते ? व दुसऱ्या कोणत्या उदाहरणावरून ते खोटे ठरतात ?

(२) माझ्या उदाहरणांतल्या 'अगणित चुकां'पैकी फक्त तामिळ भाषेचे नाव तमिळ असे लिहिले एवढेच एक उदाहरण दिले आहे. लेखकाने दिलेले नाव बरोबर आहे असे गृहीत धरले तरी त्याने माझ्या प्रतिपाद्यावर काय परिणाम होतो ?

"तमिळ्" ची उदाहरणे नागरी जाणणाऱ्या एका 'तमिळ्' भाषकाकडून घेतली आहेत. खैरेमहाशय तमिळ् जाणत असतील तर ही उदाहरणे "बोलीतली आहेत की प्रमाण लेखनातली, उच्चारानुसार लिहिली की लेखनानुसार" हे त्यांनीच स्पष्ट करावे व या स्पष्टीकरणाचा माझ्या प्रतिपाद्याशी काय संबंध पोचतो हेही स्पष्ट करावे.

(३) बसचे बसेस हे बहुवचन इंग्रजी जाणणारे शिक्षितच फक्त करतात की आणखी कोणी याचा माझ्या सिद्धान्ताशी संबंध नाही. इंग्रजी शब्द आपल्या व्याकरणासह आज लेखनातदेखील शिरले आहेत व भविष्यकाळी आजचे हे लेखन वाचणारा त्यांना आजच्या मराठीचाच भाग समजेल.

शब्द उसने घेतले की ज्या भाषेतून ते घेतले तिचे व्याकरणही त्या शब्दापुरते उसने घेतले जाते याची उदाहरणे अनेक आहेत. मराठी व हिंदीतदेखील कृपया हे संस्कृतचे विभक्तिसकट रूप रूढ आहे. तालुक या परकी शब्दाचे हिंदी/उर्दूत तालुकात असे बहुवचन होते; पण त्याच अर्थाच्या संबंध या शब्दाचे संबंधात असे रूप होत नाही. लब्ज़ या परकी शब्दाचे अल्फाज असे बहुवचन वापरण्यात येते, पण त्याच अर्थाच्या शब्द या शब्दाचे अश्वात असे रूप होत नाही.

(४) आईबाप या नात्यांचे द्योतक म्हणून केवळ मम्मीडॅडीच वापरले जाते असे नाही, मेरी मदर, मेरी वाइफ वगैरे शब्दप्रयोगही सर्रास रूढ आहेत व ललित वाङ्मयात लिहिलेही जातात.

(५) ऋग्वेदापासून आवेस्त्यापर्यन्तचा इतिहास ज्ञात नाही म्हणून त्याचे अनुमान परंपरेवरून व भाषाशास्त्र, पुरातत्त्व वगैरेंच्या आधारे करावे लागते. पण ग्रीसपर्यन्त पसरलेले इराणी साम्राज्य व युरोपभर पसरलेले रोमन साम्राज्य यांचा इतिहास ज्ञात आहे. संस्कृत धातू युरोपीय भाषांत कसे शिरले याची उपपत्ती लावण्यास हा इतिहास पुरेसा आहे.

(६) "आर्य–द्रविड" ही "मिथ्य संकल्पना" आहे हे पत्रलेखकाला मान्य आहे. म्हणजे माझा मुख्य सिद्धांत त्याला मान्य आहे हे वाचून आनन्द झाला.

**– नी. र. वऱ्हाडपांडे**

संपादक नवभारत यांस

स. न. वि. वि.

"परामानसशास्त्र" या विषयावरील माझ्या "प्रतिक्रिये"वर नोव्हेंबर १९८७ च्या नवभारताच्या अंकात दोन उत्तरे आली आहेत. त्यांपैकी मूळ लेखक प्रा. अकोलकर यांच्या उत्तरावर माझे उत्तर असे–

(१) "चेतना हे स्वतंत्र व परिणामकारी तत्त्व आहे" याचा अर्थ "चेतना शरीराहून स्वतंत्रपणे राहू शकते" असा नाही, "ती देहाशी एकरूप नाही वा देहाची आनुषङ्गिक निष्पत्ति नाही" असे अकोलकर सांगतात. चेतना देहाशी एकरूप आहे असे कुणीच म्हणत नाही, कारण मृत्यूनंतर देह राहतो, पण चेतना राहात नाही. चेतनेशिवाय देह राहतो, पण देहाशिवाय चेतना राहात नाही त्या अर्थी चेतना देहाला आनुषङ्गिक आहे हे मानलेच पाहिजे. पण अस्तित्वाच्या दृष्टीने चेतना आनुषङ्गिक असली तरी मूल्याच्या दृष्टीने आनुषङ्गिक आहे असे त्यावरून ठरत नाही. देहात चेतना राहील

तोपर्यंतच आपण त्याचे कोडकौतुक करतो, चेतना गेल्यावर निष्प्राण देह आपण जाळून टाकतो. चेतनेचे असे देहापेक्षा श्रेष्ठ मूल्य मानण्यासाठी पुनर्जन्म वा दूरमनस्कता (Telepathy) यांची काही जरूर नाही.

(२) "मृत्यूनंतरच्या जीवनासाठी" इहजीवनाचे "संयमपूर्वक व्यवस्थापन" करणे म्हणजे इहजीवनाला परलोकजीवनाची पूर्वतयारी समजणे होय. याने इहजीवनाला गौणत्व येते. परलोकजीवन जर नसेलच तर इहजीवन हेच एकमात्र जीवन असून स्वयमेव साध्य ठरते. तेव्हा परलोकवादामुळे इहजीवनाचे महत्त्व कमी होत नाही असे म्हणणे बरोबर नाही.

(३) *"भूत दिसणे हा भास असतो" हे म्हणणे* बहुतेक वेळा बरोबर असते असे अकोलकर कबूल करतात. पण "बहुतेक वेळा" या शब्दप्रयोगावरून कधी कधी खरोखरच भूत दिसते, तो भास नसतो असे सूचित होते. पण त्यांना असे सूचित करायचे आहे असे वाटत नाही. कारण पुढे "वैशिष्ट्यपूर्ण भासांची" कल्पना त्यांनी मांडली आहे. "भुते खरोखर असतात की नाही?" हा खरा प्रश्न आहे. भुतांचा भास हा भास असला तरी तो वैशिष्ट्यपूर्ण भास आहे, असे म्हटल्याने भुते असतात असे सिद्ध होत नाही

(४) जेप्सन आणि ऑस्टी यांच्या प्रयोगाविषयी "सम्यक् कल्पना" वऱ्हाडपाण्डे यांना नसावी असे विधान करून विषय सोडून देण्याऐवजी माझी टीका त्या प्रयोगाला कशी गैरलागू आहे, याविषयी अकोलकरांनी दोन शब्द अधिक लिहिले असते तर वाचकांना सत्य कळण्यास अधिक मदत झाली असती.

(५) एखाद्या कृतीचे मूल्यमापन करताना त्या कृतीच्या परिणामाबरोबरच तिच्या मागच्या हेतूचाही विचार करावा लागतो. कारण सद्हेतू असल्याशिवाय एखाद्या वर्तनाचे परिणाम केवळ यदृच्छेने चांगले होतील, बहुधा चांगले होण्याचा संभव नाही. पण भीष्म व युधिष्ठिर यांच्या वर्तनाचा विचार केला तर त्यांचे हेतू चांगले होते असेही म्हणता येत नाही. राज्यावरील अधिकार सोडून ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा करताना आपल्या म्हाताऱ्या बापाला एका सुन्दर तरुणीशी कामविलास भोगता यावे हा हेतू होता. या हेतूत कोणती उच्चता व बहुजनांच्या सुखाचा विचार आहे? शेकडो मुलींना जबरदस्तीने पळवून आणून धृतराष्ट्रासारख्या आंधळ्याच्या गळ्यात बांधण्यात कोणता सद्हेतू होता? तुझ्या नवऱ्याला तुला पणास लावण्याचा अधिकार आहे असा निर्णय देऊन द्रौपदीची विटंबना चालू ठेवण्यात कोणता सद्हेतू होता? अन्यायाचा पक्ष घेताना "अर्थस्य पुरुषो दासः" असे त्याने आपल्या वर्तनाचे समर्थन केले यातला हेतू एखाद्या भाडोत्री शिपायाच्या हेतूपेक्षा उच्च नाही.

युधिष्ठिराच्या हेतूंच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. द्यूताचे आव्हान स्वीकारणे व द्यूतात दिलेल्या वचनांचे पालन करणे हे त्याचे हेतू होते. हे हेतू सन्मान्य म्हणता येतील काय?

अकोलकरांचा मूळ लेख व त्यांचे पत्र यांतील *वृत्ती शास्त्रीय चर्चेस अनुकूल आहे. पण माझ्या "प्रति-*क्रिये" बद्दल जे दुसरे पत्र नवभारताच्या याच अंकात श्री. अद्वयानन्द गळतगे यांनी लिहिले आहे, त्याबद्दल मात्र दुर्दैवाने असे म्हणता येत नाही. या पत्रातील बहुतेक भाग (१) व्यक्तिगत शिव्या, (२) माझ्या प्रतिक्रियेशी ज्यांचा सुतराम् संबंध नाही असे ख्रिस्ती धर्म परलोकवादी आहे की नाही वगैरेसारखे मुद्दे व (३) जी विधाने मी केली नाहीत त्यांचा माझ्यावर आरोप अशा बाबींनी भरलेला आहे. या सर्व जंजाळात माझ्या प्रतिपादनाशी संबद्ध काय आहे, हे हुडकूनच काढावे लागते.

(१) परामानसशास्त्रात "अवलोकनाचेच नव्हे तर प्रयोगाचेदेखील यांत्रिकीकरण करून सांख्यिकीय यशस्विता **असंख्य** वेळा प्रस्थापित करण्यात आली आहे", असे गळतगे म्हणतात. एका अर्थी शून्य हेदेखील "असंख्य" आहे असे म्हणून या तारवादाचे– tall-talk चे– समर्थन करता येईल. गळतग्यांची समजूत अशी दिसते की दूरमनस्कता, अतीन्द्रिय प्रत्यक्ष, पुनर्जन्म वगैरे गोष्टी सिद्ध झाल्या आहेत असे या विषयाचा अभ्यास करणारे सारे मानसशास्त्रज्ञ मानतात. अकोलकरांनी या बाबतीत आपल्या लेखात काही आकडे दिले आहेत त्यावरून ही समजूत किती खोटी आहे हे दिसून येईल. १९५५ मध्ये झालेल्या सर्वेक्षणात २८ मानसशास्त्रज्ञांनी अतीन्द्रिय प्रत्यक्ष हा प्रकार केवळ अशक्य आहे असे मत दिले. परामानसशास्त्रीय म्हणून मानल्या गेलेल्या साऱ्या घटना सिद्ध झाल्या आहेत असे किती जगन्मान्य मनोवैज्ञानिकांचे मत आहे, याचा आकडा अकोलकरांनी दिला नाही, कारण तो नगण्यच असणार. ९१ प्रतिशत मनोवैज्ञानिकांनी हे संशोधन

व्हावयास हवे एवढेच केवळ म्हटले आहे, त्याचे निष्कर्ष आपल्यास मान्य आहेत असे म्हटले नाही. ९ प्रतिशत मनोवैज्ञानिकांनी संशोधन करण्याच्या लायकीचाही हा विषय नाही असे मत दिले ही गोष्ट महत्त्वाची आहे.

(२) पुनर्जन्म मानल्यास देह जळून खाक झाल्यावरही त्यातील चेतना स्वतंत्रपणे राहू शकते या अत्यंत अविश्वसनीय गोष्टीवर विश्वास ठेवावा लागतो. पण दूरमनस्कता दोन जिवंत व्यक्तींतच होत असल्यामुळे ती संभाव्य मानण्यात कोणत्याही अत्यंत अविश्वसनीय गोष्टीवर विश्वास ठेवावा लागत नाही. म्हणून पुनर्जन्मापेक्षा दूरमनस्कता ( Telepathy ) अधिक विचारार्ह आहे. पण विचारार्ह आहे याचा अर्थ सिद्ध आहे असा होत नाही Telepathy ही घटनाच असिद्ध असल्यामुळे ती मेन्दूतील विद्युल्लहरींद्वारा होत नाही हे सिद्ध करणे फारच सोपे आहे. त्यासाठी 'व्हॅसीलिएव या रशियन शास्त्रज्ञा'ची गरज नाही. दूरमनस्कतेची शेकडो निर्विवाद उदाहरणे उपलब्ध असली व प्रयोगशाळेत हुकमी रीतीने विचारसंक्रान्ती घडवून आणता आली तरच ती कशी घडते याची प्रक्रिया सांगण्याचा प्रश्न उद्भवेल. आज तो प्रश्नच उद्भवलेला नाही.

(३) कार्यकारणभावाची कल्पना प्रत्यक्षनिरपेक्ष तर्कावर आधारलेली आहे असे मी कुठेच म्हटले नाही. ही कल्पना प्रत्यक्षनिष्ठ तर्कावर आधारलेली आहे. त्यामुळे तिला श्रद्धा म्हणता येत नाही. श्रद्धा प्रत्यक्षनिष्ठ तर्कावर आधारलेली नसते. तसेच प्रत्यक्षनिष्ठ तर्काच्या आधारावर कार्यकारणभाव असिद्ध ठरला तर वैज्ञानिक त्याचा त्याग करतील. श्रद्धा विरुद्धप्रमाण मिळाले तरी नाहीशी होत नसते. माझ्या 'प्रतिक्रियेत' हा मुद्दा मी स्पष्टपणे मांडला आहे.

(४) "आत्मा, परलोक, ईश्वर, पुनर्जन्म. इ. न मानणारा एक तरी सन्त– रामकृष्ण, डायोजिनिस यांच्या तोडीचा– दाखवून देता येईल काय ?" असे गळ-तगे विचारतात. "जास्तीतजास्त लोकांचे जास्तीतजास्त सुख साधणे म्हणजे नीती" या कसोटीनुसार हजारो लोकांना आपल्या कौशल्याने दृष्टिदान करणारा शल्यज्ञ म्हणजे सर्जन, लाखो लोकांना आपल्या कलेने मन्त्रमुग्ध करणारी एखादी नटी व रोजच्या व्यवहारात उपयोगी पडणारी यंत्रे निर्माण करून एकूण समाजाच्या सुख-सोयीत भर टाकणारे वैज्ञानिक यांच्या जीवनाचे नैतिक मूल्य रामकृष्ण व डायोजिनिस यांच्या जीवनाच्या नैतिक मूल्यापेक्षा श्रेष्ठ आहे. या मुद्द्याची विस्तारपूर्वक चर्चा मी आपल्या विवेकवाद या ग्रंथातील "संतत्वाचे मूल्यमापन" या लेखात केली आहे. लोकांच्या सुखात भर घालणारे शास्त्रज्ञ व कलावन्त आस्तिक आहेत की नास्तिक हा प्रश्न नैतिक दृष्टचा पूर्णपणे अप्रस्तुत आहे.

(५) "परामानसशास्त्राने प्रकाशात आणलेल्या घटना खऱ्या आहेत असे ठरले तरी त्यामुळे तत्त्वज्ञानावर काही परिणाम होणार नाही." हे माझे विधान टेलीपॅथीला अनुलक्षून आहे. टेलीपॅथी खरी मानली तरी त्यामुळे मरणोत्तर जीवन सिद्ध होत नाही हे मी दाखवून दिलेच आहे.

(६) परामानसशास्त्राचे दावे वैज्ञानिक कसोटचांनी सिद्ध होत असतील तर ते अतिप्राकृतिक असूच शकत नाहीत. ते अतिप्राकृतिक असतील तर वैज्ञानिक कसोटचांनी सिद्धच होऊ शकणार नाहीत. तेव्हा एक तर अतिप्राकृतिक वस्तूंचा विचार तरी सोडावा लागेल वा वैज्ञानिक पद्धती वापरण्याचा अट्टाहास तरी सोडावा लागेल.

**– नी. र. वऱ्हाडपाण्डे**



## सार-संकलन

### सौ. झरदारी

हे नाव जरी आपल्या परिचयाचे नसले तरी ज्या व्यक्तीचे हे नाव आहे ती व्यक्ती गेली अनेक वर्षे पाकिस्तानच्या राजकीय रंगमंचावरील एक अत्यंत महत्त्वाची व्यक्ती आहे. डिसेंबर १८ रोजी कु. बेनझीर भुट्टो यांनी श्री. असिफ झरदारी यांच्याशी विवाह केला आणि हे नवीन नाव धारण केले. लग्न पारंपरिक पद्धतीने ठरविण्यात आले असे सांगण्यात येते. म्हणजे बेनझीर भुट्टो यांच्या आईने वर नेमस्त केला. लग्न पारंपरिक पद्धतीने लावण्यातही आले. असिफ झरदारी हे सिंधच्या एका बड्या जमीनदार कुटुंबातील आहेत. भुट्टो हेही बडे सिंधी जमीनदार घराणे आहे. तेव्हा वधू-वर एकमेकांस अनुरूप आहेत. पाकिस्तानी समाज एकंदरीत सनातनी, परंपरावादी आहे.

ह्या लग्नाचे बेनझीर भुट्टो यांच्या राजकीय भवितव्यावर काय परिणाम होतील ? ( त्यांच्या नावावर ह्या लग्नाचा काही परिणाम होणार नाही कारण त्यांनी आपले पूर्वीचेच नाव लावण्याचे ठरविले आहे.) आपण एक राजकीय व्यक्ती आहोत ही गोष्ट बेनझीर भुट्टो लग्नसमारंभातही विसरल्या नाहीत. लग्नाच्या सोहळ्याचा भाग म्हणून कराचीच्या झोपडपट्टीत त्यांनी जो स्वागतसमारंभ आयोजित केला होता त्याला सुमारे एक लाख लोक उपस्थित होते. परदेशी बातमीदारांना दिलेल्या एका खास मुलाखतीत भुट्टो यांनी केलेले एक विधान असे आहे की, " माझा लोकशाहीवर विश्वास असल्यामुळे झिया यांच्या हुकूमशाहीचा शेवट करण्याच्या उद्दिष्टाचा मी अव्यभिचारी निष्ठेने पाठपुरावा करीत आले आहे. " त्या पुढे म्हणाल्या, " लग्नामुळे ह्या विश्वासात बदल घडून येण्याचे कारण नाही किंवा ह्या प्रयत्नांवर काही परिणाम होण्याचे कारण नाही. "

त्यांना हे म्हणणे भाग आहे कारण ह्या लग्नामुळे त्यांचे अनुयायी काहीसे विचलित झाले आहेत यात शंका नाही. गेल्या वर्षी जेव्हा त्यांचा वाङ्निश्चय जाहीर झाला तेव्हा काही प्रक्षुब्ध तरुणांनी सिंधमध्ये त्यांच्या छायाचित्रांची भित्तिपत्रके ( पोस्टर्स ) फाडून टाकली. मुस्लिम परंपरेप्रमाणे लग्न झाल्यावर स्त्री तिच्या नवऱ्याच्या आणि कुटुंबाच्या पूर्णपणे अंकित होते. बेनझीर भुट्टो ह्या परंपरेपुढे शरणागती पत्करतील असे कुणी मानीत नाही. तरीही आपले सार्वजनिक, राजकीय जीवन आणि आपले वैयक्तिक जीवन पूर्णपणे अलग राखणे त्यांना कठीण जाईल. ज्या पक्षाचे नेतृत्व त्या करीत आहेत तो म्हणजे 'पाकिस्तान पीपल्स पार्टी' हा पक्ष. आणि त्यांचे वडील झुल्फिकार भुट्टो यांनी असिफ झरदारी यांच्या वडिलांची ( म्हणजे आपल्या भावी व्याह्यांची) ह्या पक्षातून हकालपट्टी केली होती.

ही एक गोष्ट. दुसरी गोष्ट अशी की, लोकांना भुलवून आपल्या मागे खेचून आणण्याची एक विलक्षण शक्ती भुट्टो यांच्याकडे होती. ही जादू बेनझीर भुट्टो यांच्यात पैतृक वारशाने अवतरली आहे अशी श्रद्धा पाकिस्तानी जनतेत होती. बेनझीर भुट्टो यांच्या नेतृत्वाचे ते अधिष्ठान होते. भुट्टो यांची अविवाहित कन्या म्हणून त्या जोपर्यंत वावरत होत्या तोपर्यंत हे जादूचे वलय अबाधित होते. त्यांच्या लग्नामुळे त्याला तडा गेला आहे. एक संसारी स्त्री हे स्वरूप त्यांना प्राप्त झाले आहे.

गेले वीस महिने भुट्टोवादाच्या निशाणाखाली पाकिस्तानी जनतेला संघटित करण्याचा बेनझीर भुट्टो यांचा प्रयत्न आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारात भुट्टो यांच्या अनेक धोरणांना त्यांनी तिलांजली दिली आहे. भुट्टो ज्या समाजवादाची घोषणा करीत होते तो त्यांनी बराच पातळ केला आहे आणि परराष्ट्रीय राजकारणात राष्ट्रवादावर आधारलेल्या अलिप्ततावादाऐवजी अमेरिकेचा अनुनय करण्याचे धोरण त्यांनी स्वीकारले आहे. गेल्या डिसेंबरमध्ये झालेल्या स्थानिक निवडणुकांत त्यांच्या पक्षाला फारसे यश लाभले नाही. याचे एक कारण भुट्टो यांच्या भूमिकेपासून त्यांचा पक्ष दूर सरकत चालला आहे ह्या लोकांना झालेल्या जाणिवेत सापडू शकेल. बेनझीर भुट्टो यांच्या लग्नामुळे हा भ्रमनिरास अधिक गडदही होईल.

उलटपक्षी ह्या लग्नामुळे बेनझीर भुट्टो यांचे राजकीय स्थान अधिक बळकट होईलही. बाईने लग्न केले पाहिजे असा आग्रह धरणाऱ्या परंपराप्रिय पाकिस्तानी समाजाला बेनझीर भुट्टोंचे अखंड कौमार्य पसंत पडले नसते. एक संसारी स्त्री म्हणून त्यांना कदाचित अधिक मान्यता, विश्वासार्हता लाभेल. शिवाय लग्न करायचेच तर आईने ठरवून दिलेल्या वराशी ते करण्यात त्यांनी जो शहाणपणा दाखविला आहे तोही पाकिस्तानी जनतेच्या पसंतीला उतरेल.

## माफियाविरुद्ध मोहीम

माफिया ही जबरदस्त गुप्त, गुन्हेगार संघटना मूळची सिसिलीमधली. पण तिचे जाळे सर्व देशांत आणि विशेषत: अमेरिकेत पसरलेले आहे. हेरॉइन इ. मादक द्रव्यांचा व्यापार हा तिचा प्रमुख व्यवसाय आहे. एका अधिकृत अंदाजाप्रमाणे अमेरिकेतील मादक द्रव्यांच्या व्यापाऱ्यांकडून सिसिलीतील माफियाला दर महिन्याला १·१ कोटी डॉलर एवढी रक्कम रवाना होते. शिवाय माफियाचे राजकीय पक्षांच्या स्थानिक पुढाऱ्यांशी धागेदोरे प्रस्थापित झालेले असतात. त्यांतून सार्वजनिक बांधकामाची जी कंत्राटे माफियाला मिळतात त्यांच्यापासून तिला तिचे कायदेशीर उत्पन्न मिळते. सिसिलीमध्ये जे दारिद्र्य आणि बेकारी आहे त्यातून माफियासारख्या गुन्हेगार संघटनांना खतपाणी मिळते यात शंका नाही. पण दारिद्र्य व बेकारी यांच्या निर्मूलनासाठी इटालिअन सरकार जी भांडवली गुंतवणूक सिसिलीमध्ये करते त्यातील बऱ्याच पैशावर माफियाचेच नियंत्रण आहे.

गेल्या काही वर्षांत सिसिलीच्या न्यायाधिकाऱ्यांच्या एका गटाने माफियाचा बंदोबस्त करण्याच्या कार्यास वाहून घेतले आहे. त्यांतील एक प्रमुख न्यायाधिकारी म्हणजे जियोवानी फॉलसोन हे होत. गेली सहा वर्षे ते स्वतःच्याच घरात एका कैद्यासारखे जगत आहेत. 'बुलेट-प्रुफ' मोटारने ते कार्यालयाला जातात. जाता-येताना सशस्त्र सैनिकांचे एक पथक त्यांच्या संरक्षणासाठी सोबतीला असते. कार्यालयाचे दरवाजे पोलादी आहेत आणि खिडक्यांवर पोलादी जाळ्या बसविल्या आहेत. गेल्या ६ वर्षांत फॉलसोन यांच्या पाच सहकारी न्यायाधिकाऱ्यांचे आणि वीस पोलिस अधिकाऱ्यांचे खून करण्यात आले आहेत.

फॉलसोन यांच्या पुढाकाराने सिसिलिअन माफियाविरुद्ध चालविण्यात आलेला खटला गेले बावीस महिने चालू होता. १६ डिसेंबर रोजी त्याचा निकाल लागला. ह्या निकालाप्रमाणे देण्यात आलेल्या शिक्षांची बेरीज केली तर २,६६५ वर्षांचा तुरुंगवास एवढी ती भरते. त्यात १९ जणांना आजन्म कारावास ठोठावण्यात आला आहे.

पण ह्यामुळे सिसिलिअन माफियाचा पुरता बंदोबस्त झाला आहे असे नव्हे. फॉलसोन आणि त्यांचे सहकारी हेच असा इशारा देत आहेत. गेल्या खटल्यात ४५० इसम माफियाचे आरोपित सभासद म्हणून दाखल करण्यात आले होते. त्यांतील ११९ व्यक्तींवर गुन्हा शाबीत होऊ शकला नाही. बाकीच्यांना शिक्षा झाल्या. पुढील दोन खटले अनुक्रमे ८० आणि १२४ आरोपींविरुद्ध दाखल करण्यात आले आहेत. चवथा खटला १९८८ साली सुरू होईल व त्याच्यात २४८ आरोपी असतील.

पण ही माफियाची दृश्य बाजू आहे. फॉलसोन यांचे म्हणणे असे आहे की, माफियाचे नियंत्रण करणारा एक लहान गट आहे आणि तो नेहमी धुक्यात वावरतो. माफियाकडून जे खून आणि सर्व प्रकारचे बेकायदेशीर व्यवहार घडतात त्यांना अखेरीस हा गट जबाबदार असतो. न्यायालयाला हे म्हणणे पटलेले आहे. टोमासो बुस्केटा ह्या माफियाच्या एका भूतपूर्व आणि पश्चात्तप्त सदस्याने जो कबुलीजबाब दिला त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. ह्या कबुलीजबाबामुळे इटलीमध्ये ३०० इसमांची धरपकड करण्यात आली. बुस्केटा यांना ३½ वर्षांची शिक्षा झाली आहे पण सध्या ते संरक्षित साक्षीदार म्हणून अमेरिकेत आहेत. त्यांनी दिलेल्या माहितीमुळे अमेरिकेतील अनेक माफिया-कुटुंबांवर खटले भरणे शक्य झाले आहे.

अमेरिकेतील हेरॉइनच्या प्रचंड व्यापारातून जो फायदा होतो त्यावर सिसिलीच्या माफियांची मुख्य मदार आहे. तेव्हा हा पैसा ज्या मार्गांनी अमेरिकेहून सिसिलीला जातो, त्यांच्यावर जर पोलिसांची पकड बसली तर माफियाचे कंबरडे मोडू शकेल. पण हे मार्ग फार गुंतागुंतीचे आणि अंधुक आहेत.

एके काळी बॅगांत भरलेल्या डॉलर्सच्या नोटा सरळ अमेरिकेतून सिसिलीला येत. तसे आता होत नाही. आता आंतरराष्ट्रीय बँकांच्या व्यवहारातून ते सिसिलीला

पोहोचते केले जातात. अनेक 'डमी' कंपन्यांमार्फत हे व्यवहार होतात. करमुक्त प्रदेशांत ह्या कंपन्या रजिस्टर झालेल्या असतात. पुढे सिसिली आणि इटली-मध्ये हा पैसा पूर्णपणे कायदेशीर अशा व्यवहारात गुंतविण्यात येतो. मादक द्रव्यांच्या व्यापाराविरुद्ध उभारण्यात आलेल्या अमेरिकन यंत्रणा आणि सिसिलीचे काही ध्येयवादी न्यायाधिकारी यांच्या सहकार्यामुळे माफियाविषयीची बरीच विश्वसनीय माहिती उजेडात आली आहे व पुढील कारवाई करणे तुलनेने सोपे झाले आहे.

## विज्ञानाची तीन शतके

१९८७ चा शेवटचा महिना. आयझॅक न्यूटनचा 'प्रिन्सिपिया'– सबंध नाव 'फिलॉसॉफिया नाटरालिया प्रिन्सिपिया मॅथेमॅटिका'; 'निसर्ग-तत्त्वज्ञानाची गणिती तत्त्वे'– १६८७ मध्ये प्रसिद्ध झाला. लाव्हॉयझ्येचे नवीन रसायनशास्त्र १७८७ मध्ये उजेडात आले. १८८७ साल हे हिप्नॉटिझम किंवा मोहनिद्रा या विषयावरील वादंगाने गाजले. त्या मानाने १९८७ साल वैज्ञानिक गाजावाजा न होता पार पडले. २०८७ साली काय होईल ?

न्यूटनचे प्रिन्सिपिया प्रसिद्ध होण्याला एडमंड हॅली हा खगोलशास्त्रज्ञ प्रामुख्याने जबाबदार होता. १६८४ साली हा न्यूटनला भेटण्यासाठी केंब्रिजला गेला होता. हॅलीने न्यूटनला केलेला एक प्रश्न असा होता : समजा एखाद्या बिंदूपासून निघालेला जोर त्या बिंदूपासूनच्या अंतराच्या वर्गाच्या प्रमाणात दुर्बल होत जातो. म्हणजे समजा ब हा बिंदू आहे आणि ब पासून ज हा जोर निघतो. व जर ब ह्या ठिकाणी ज चे मूल्य म असेल व ब आणि क ह्या बिंदूमध्ये अ एवढे अंतर असेल तर क ह्या ठिकाणी ज चे मूल्य $\frac{म}{अ^२}$ एवढे असेल. प्रश्न असा की अशा जोराच्या प्रभावाखाली फिरणाऱ्या वस्तूचा भ्रमणपंथ कसा असेल ? केप्लरने ग्रहांच्या भ्रमणाविषयीचे जे नियम सिद्ध केले होते त्यांवरून असा एक जोर ग्रहांच्या भ्रमणामागे असला पाहिजे असे दिसत होते.

न्यूटनने उत्तर दिले की अशा जोराच्या प्रभावाखाली फिरणाऱ्या वस्तूचा भ्रमणपंथ लंबवर्तुलात्मक असला पाहिजे हे आपण मागेच गणिताने सिद्ध केले आहे. हॅलीशी झालेल्या भेटीच्या वेळी ती सिद्धी न्यूटनला आठवली नाही. पण आपण ती लिहून कळवू असे आश्वासन त्याने हॅलीला दिले. हा प्रिन्सिपियाच्या लेखनाचा प्रारंभ होय.

प्रिन्सिपियाचे तीन खंड आहेत. पहिल्या दोन खंडांत न्यूटनने गतीच्या नियमांची मांडणी केली आहे आणि भिन्न जोरांच्या प्रभावाखाली वस्तू कशा भ्रमण करतात हे दाखवून दिले आहे. न्यूटनपूर्वी देकार्तने आवर्त किंवा चक्र (व्होर्टेक्स) ह्या संकल्पनेचा वापर करून ग्रहांच्या भ्रमणपंथांचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला होता. ह्या गृहीतकापासून (हायपॉथिसिस) ग्रहांचा भ्रमणपंथ लंबवर्तुलात्मक असला पाहिजे असे निष्पन्न होत नाही हे न्यूटन दाखवून देतो.

तिसरा खंड हा विधायक खंड आहे. त्याच्यात 'गुरुत्व'– ग्रॅव्हिटेशन ही संकल्पना न्यूटन प्रविष्ट करतो. जडद्रव्याचा प्रत्येक कण दुसऱ्या प्रत्येक कणाला ज्या जोराने आकर्षण करून घेतो आणि त्याच्याकडून आकर्षिला जातो ते त्याचे गुरुत्व. गुरुत्वाकर्षणाच्या नियमापासून ग्रहांचे सूर्याभोवतीचे भ्रमणपंथ, गुरु आणि शनि यांच्या उपग्रहांचे ह्या ग्रहांभोवतालचे भ्रमणपंथ, चंद्र आणि धूमकेतू यांचे भ्रमणपंथ तसेच सूर्य आणि चंद्र यांच्या एकवटलेल्या आकर्षणामुळे समुद्राच्या पाण्याची होणारी हालचाल–भरती-ओहोटी– या साऱ्यांचा सुसंगतपणे उलगडा करता येतो. प्रिन्सिपिया प्रसिद्ध झाल्यावर हॅलीने त्याच्यावर आपले स्तुतिपर परीक्षण लिहिले. न्यूटनच्या गणिताचा व गुरुत्वाकर्षणाच्या कल्पनेचा उपयोग करून, १६८२ मध्ये दिसलेला धूमकेतू – हॅलीचा धूमकेतू – हाच १६०७ मध्ये केप्लरने पाहिलेला आणि १५३१ मध्ये कोपर्निकसने पाहिलेला धूमकेतू होय हा शोध त्याने लावला.

'रसायनशास्त्रातील नामाभिधान पद्धती' (नॉमेनक्लेचर) हे पुस्तक (फ्रेंचमध्ये) १७८७ मध्ये प्रसिद्ध झाले. लाव्हायझ्येने 'ऑक्सिजन' आणि हायड्रोजन यांचा शोध लावला होता आणि ही नावे आणि मूलद्रव्याची त्याची संकल्पना ह्या नवीन नामाभिधान पद्धतीला आधारभूत होत्या. आम्लांविषयी लाव्हायझ्येची उपपत्ती अशी होती की आम्ल हे कोणतीतरी 'रासायनिक मृत्तिका' – chemical earth– आणि ऑक्सिजन यांच्या संयोगातून बनते. 'ऑक्सिजन' हा ग्रीक शब्द आहे आणि आम्लजनक असा त्याचा अर्थ आहे. बंद पात्रात धातू जाळल्याने त्याची जी रक्षा लाभते तिच्यात तो धातू आणि ऑक्सिजन यांचा संयोग झालेला असतो

असे लाव्हायझ्ये यांचे म्हणणे आहे. अशा धातुरक्षांना लाव्हायझ्येने 'ऑक्साइड' हे नाव दिले आहे.

पूर्वी हायड्रोजनला ज्वलनग्राही हवा–इन्फ्लेमेबल एअर–आणि ऑक्सिजनला फ्लॉजिस्टॉनविरहित हवा –डीफ्लॉजिस्टिकेटेड एअर–असे म्हणत. ह्या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या दोन वर्षे पूर्वी लाव्हायझ्येने ज्वलनग्राही हवा फ्लॉजिस्टॉनविरहित हवेत जाळून पाणी बनविले होते. ह्या प्रयोगापासून 'हायड्रोजन' ह्या नावाची उत्पत्ती झाली आहे. 'हायड्रोजन' म्हणजे जलजनक.

जळण्याच्या प्रक्रियेच्या स्वरूपाविषयी पूर्वीचे रसायनशास्त्रज्ञ आणि लाव्हायझ्ये यांच्यात मूलभूत मतभेद होता. तांबे जाळल्याने जी रक्षा मिळते तिला ताम्ररक्षा ( copper calx ) म्हणतात. जुन्या रसायनशास्त्रज्ञांच्या मते ताम्र हे एक संयुक्त द्रव्य आहे. त्याच्यात ताम्ररक्षा आणि फ्लॉजिस्टॉन ह्या दोन द्रव्यांचा संयोग झालेला असतो. जेव्हा तांबे जाळण्यात येते तेव्हा त्याच्यात असलेला फ्लॉजिस्टॉन हा घटक त्याच्यातून बाहेर पडतो आणि फक्त ताम्ररक्षा हे साधे द्रव्य मागे राहाते. लाव्हायझ्येचे म्हणणे ह्याच्या नेमके उलट होते. तांबे हा धातू हे साधे द्रव्य आहे. जेव्हा ते जाळण्यात येते तेव्हा नेहमीच्या हवेत असलेल्या ऑक्सिजनचा त्याच्याशी संयोग होतो आणि ताम्ररक्षा बनते. ताम्ररक्षा हे संयुक्त द्रव्य आहे आणि त्याला लाव्हायझ्ये तांब्याचे ऑक्साइड म्हणतो.

लाव्हायझ्येपूर्वीची रसायनशास्त्राची परिभाषा चित्रविचित्र आणि अव्यवस्थित होती. प्रत्येक भिन्न रासायनिक पदार्थाला स्वतंत्रपणे नाव देण्यात येत असे आणि माणसाच्या नावावरून ज्याप्रमाणे त्याच्या रूपगुणांची कल्पना करता येत नाही त्याप्रमाणे पदार्थाच्या नावावरून त्याच्या गुणधर्मांची किंवा घडणीची कल्पना करता येत नसे. लाव्हायझ्येने घालून दिलेल्या तत्त्वांप्रमाणे रासायनिक परिभाषा सुटसुटीत व व्यवस्थित झाली असती. पण फ्लॉजिस्टॉनविषयीच्या मतभेदांमुळे तिला बराच विरोधही झाला.

मोहनिद्रा–हिप्नॉटिझम–विषयीचा वाद १८८७ मध्ये रंगात आला होता. त्याच्यामागे जां–मार्टिन शार्को ( Jean–Martin Charcot ) हा प्रसिद्ध फ्रेंच डॉक्टर होता. शार्कोंने मोहनिद्रेचा आस्थेने अभ्यास केला होता. त्याच्या अगोदर मोहनिद्रा हे भोंदू वैद्य वापरीत असलेले एक तंत्र म्हणून कुप्रसिद्ध आणि अप्रतिष्ठित होते. शार्को यांनी असे दाखवून दिले की, उन्मादवायू (हिस्टीरिया) ह्या रोगात जी शारीरिक आणि मानसिक लक्षणे आढळून येतात ती मोहनिद्रेनेही निर्माण करता येतात. तेव्हा मोहनिद्रा आणि उन्मादवायू ह्यांचे एक समान मूळ असले पाहिजे. आता मोहनिद्रा ही मानसिक कारणांनी निर्माण करण्यात आलेली एक मानसिक अवस्था आहे. तेव्हा असा निष्कर्ष निष्पन्न होतो की उन्मादवायू ही शारीरिक व्याधी नव्हे. त्याची काही शारीरिक लक्षणे असली–उदा. उन्मादवायूमुळे कित्येकदा पक्षघात– पॅरॅलिसिस– झालेला असतो तरी ह्या रोगाचे मूळ मानसिक असते. काही विकृत कल्पना त्याच्या मुळाशी असतात. ह्या कल्पना मनाच्या सजाण भागात नसतात. त्या अजाण भागात असतात.

सिग्मुंड फ्रॉइड ह्या तरुण व्हिएनीज डॉक्टरने शार्को यांना पाठिंबा दिला. शार्को यांच्या फ्रेंच लिखाणाचे त्याने जर्मनमध्ये भाषांतर केले. अशा रीतीने फ्रॉइड अजाण मनाच्या मागावर राहिला. अजाण मनाचे स्वरूप व कार्य यांच्यावर पकड बसविण्यापूर्वी त्याला अजून बरीच वाटचाल करायची होती.

इ. स. २०८७ साली कोणता वैज्ञानिक वाद रंगलेला असेल ?



अनुक्रमणिका





हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




